# सम्पत्ति-दान-यज्ञ

विनोबांनी सुरू केलेल्या सम्पत्ति-दान-यज्ञाचें
तात्त्विक व व्यावहारिक विवेचन

[ मूळ हिंदीचे मराठी भाषांतर ]



श्रीकृष्णदास जाजू

अखिल भारत सर्व सेवा संघ-प्रकाशन,
१९५५

# परिचय :--

'सम्पत्ति-दान-यज्ञ' पुस्तिकेचें हें चौथे संस्करण ह्या पुस्तकाच्या लोकप्रियतेचें आणि अुपयोगितेचें द्योतक आहे. प्रथम जेव्हां ही पुस्तिका गांधी-स्मारक-निधीच्या मध्यप्रदेश-शाखेकडून प्रकाशित झाली तेव्हां तिचें स्वरूप फार लहान होतें. पण पूर्वीची तीन हिंदी संस्करणें परिवर्धित आणि परिष्कृत होतां होतां आतां ही पुस्तिका अधिकृतच नव्हें, पण अद्यतनहि झाली आहे. विनोबांच्या ह्या विषयावरील आजवरच्या विचारांचें सारहि ह्यांत आलें आहे.

ह्यांत सम्पत्ति-दान-यज्ञावर व्यावहारिक दृष्टीने आणि विशेषत: सम्पत्तिवान लोकांसाठी तर्कयुक्त विवेचन केलें आहे. सर्वोदय-सम्मेलनाच्या अेतद् विषयक चर्चेचें सारहि ह्यांत दिलें आहे.

ह्या पुस्तिकेचें चार विभाग करण्यांत आलें आहेत. पहिल्या विभागांत गांधीजींनी लिहिलेला सम्पत्ति-दानासंबंधीचा अेक लेख अुद्धृत केला आहे. तो लेख सम्पत्ति-दान-यज्ञासाठीं आधारभूत आहे. दुसऱ्या विभागांत पू. विनोबांच्या ह्या विषयींच्या लेखांतून व प्रवचनांतून महत्वपूर्ण अंश संकलित केलें आहेत. ह्या भाग निरनिराळ्या प्रवचनांतून घेतला असल्यामुळें ह्या संकलनांत विचारांचा वाहता प्रवाह अेकसारखा न दिसतां तुकड्यांच्या रूपांत दिसेल. तिसऱ्या व चौथ्या विभागाचें संपूर्ण विवेचन श्री. जाजूजींनी लिहिलें आहे. चौथ्या विभागांत व्यावहारिक गोष्टींचें दिग्दर्शन आहे.

ह्या पुस्तकानें सम्पत्ति-दान-यज्ञाचा योग्य आशय समजण्यास मदत होईल अशी आशा आहे.

वर्धा, संयोजक, संपादन-समिति

तारीख १४ मार्च '५५

# अनुक्रमणिका



**परिशिष्ट :**



---

चुकीची दुरुस्तीः— पृष्ठ ६३ वर 'हिश्यांची परिभाषा' या शीर्षका-ऐवजी 'हिश्याचा परिमाण' वाचावें.

# सम्पत्ति-दान-यज्ञ

### विभाग पहिला

## समान वितरण

### ( गांधीजी )

प्रत्येक माणसाला त्याच्या नैसर्गिक गरजा भागविण्याअितकीच साधनसामुग्री मिळावी, त्यापेक्षां अधिक मिळू नये असा समान वितरणाचा वास्तविक आशय आहे. अुदाहरणार्थ :— पचन क्रिया मद असणाऱ्या अशक्त अिसमाला फक्त १० तोळे वजनाच्या पोळ्या पुरेशा होतील आणि अेखाद्या सशक्त माणसाला ४० तोळे वजनाच्या पोळ्या लागतील. म्हणजे समाजातील या दोघांच्याहि गरजा पूर्ण होअू शकल्या पाहिजेत. हें ध्येय अमलांत आणण्यासाठी सपूर्ण सामाजिक व्यवस्थेची पुनर्रचना करावी लागेल. अहिंसक समाज ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ध्येयाचें सगोपन करू शकत नाही. कदाचित् हे ध्येय आम्ही पूर्णपणे अमलांत आणूं शकणार नाही पण ह्या ध्येयाची सतत जाणीव ठेवून त्याच्या जवळ जवळ पोंचण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. ज्या प्रमाणात आपण या ध्येयाकडे जाअू त्या प्रमाणात आपल्याला सुख आणि समाधान मिळेल. आणि अहिंसक समाज अस्तित्वात आणण्याच्या प्रयत्नात आपली त्या प्रमाणात मदत होअील.

### प्रारभ कसा व्हावा ?

समान वितरण अहिंसक पद्धतीने कशा प्रकारें होअील याचा आता आपण विचार करू. ज्याने या ध्येयाला आपल्या जीवनाचें अंग मानलें,त्याला आपल्या वैयक्तिक जीवनात आवश्यक बदल घडवून आणण्याचे पहिलें पाअूल

ह्या मार्गानुसार अुचलावे लागेल. त्याला भारतीय दारिद्र्याची जाणीव ठेवून आपल्या नित्याच्या गरजा कमीत कमी करून घ्याव्या लागतील. प्रपचासाठी कमाअी करताना तो अप्रामाणिकपणें वागणार नाही अगर सट्ट्याचा अुपयोग करून पैंसे मिळविणार नाही. म्हणजेच तो आपली राहणी जीवनाच्या ह्या नव्या विचारानुरूप ठेवील. त्याच्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत सयम राहील. स्वत.च्या जीवनात शक्य तितक्या सुधारणा घडवून आणल्यानतरच तो आपल्या मित्रांत आणि शेजाऱ्यात ह्या ध्येयाचा प्रचार करण्यास लायक होअील.

## धनिकानी सम्पत्तीचें विश्वस्त बनावें

समान वितरणाच्या सिद्धान्ताच्या बुडाशी, धनिकांजवळ जी अधिक सम्पत्ति आहे तिच्या ट्रस्टीपणाचा (विश्वस्तपणाचा) विचार निहित आहे यांत शका नाही. कारण या सिद्धातानुसार श्रीमताना आपल्या शेजाऱ्यापेक्षा अधिक पैसा स्वत.जवळ ठेवता येत नाही. पण हे कसे होअू शकेल ? अहिंसक मार्गाने की धनिकाजवळची सपत्ति हिसकावून घेण्याने ? दुसऱ्या पद्धतींत स्वाभाविकपणेच आपल्याला हिंसेचा आश्रय घ्यावा लागेल. हिंसक अुपायांनी समाजाचा लाभ होअू शकत नाही. त्याने समाज दुर्बल होअील. कारण सपत्ति कमाविण्याची शक्ति असणाऱ्या लोकाच्या सद्‌गुणापासून समाजाला वंचित रहावें लागेल. म्हणून अहिंसक मार्ग अधिक चागला आहे हे अुघड आहे. श्रीमत आपली सपत्ति आपल्या ताब्यात(स्वाधीन) ठेवू शकेल. त्यांतून स्वतःच्या गरजा पूर्ण करण्यासाठी योग्य रकमेचा अुपयोग करून अुरलेल्या सपत्तीचा समाजहितासाठी अुपयोग व्हावा म्हणून, अेक विश्वस्त ह्या नात्याने तो काम करील ह्या नर्वांत विश्वस्ताचा प्रामाणिकपणा गृहीत धरलेला आहे.

## सत्याग्रहाचें स्थान

आटोकाट प्रयत्न केल्यानतरहि जर श्रीमत लोक खऱ्या अर्थाने गरिबांचे सरक्षक बनले नाहीत आणि गरिबांची अधिकाधिक पिळवणूक होअून ते

भुकेनें व्याकुळ झाले तर काय करावें ? हा प्रश्न सोडविण्याच्या प्रयत्नांतच मी अहिंसक असहकार आणि सविनय अवज्ञा यांसारख्या योग्य आणि अचूक साधनाकडे वळलों आहे. गरिबांच्या सहकार्याशिवाय श्रीमंत लोक संपत्ति जमवूं शकत नाहीत. पण गरिबांना हें ज्ञान देऊन त्याचा फैलाव झाला तर ते बलवान होतील व ज्या विनाशकारी असमानतेमुळें ते उपाशी पोटीं मरत आहेत तींतून अहिंसक साधनांच्या सहाय्यानें मुक्त होण्याची कला ते शिकून घेतील.

'हरिजन', २५–८–४०

---

विभाग दुसरा

# सब सम्पत रघुपति कै आही

'सगळी संपत्ति ओीश्वराची आहे.'

(विनोबा)

[विनोबांच्या विभिन्न प्रवचनांतून सारांश रूपाने खालील संकलन केले आहे.]

ता १८ अेप्रिल १९५१ रोजी, भूदान-यज्ञाची कल्पना मला सुचली. आता देशभर सर्व लोकाना ही कल्पना आवडली आहे असे मानायला हरकत नाही. भूमि-दान-यज्ञाबरोबरच संपत्ति-दान-यज्ञ देखील कां चालू करूं नये याचा विचार माझ्या मनांत चालल्लाच होता. पण भूमीचा प्रश्न मूलभूत आहे आणि हा प्रश्न सुटला नाही तर देशात धोका अुत्पन्न होओील असे मला वाटत होते. ह्याशिवाय भूमि परमेश्वराची प्रत्यक्ष देणगी आहे ही गोष्ट सगळ्याना सहज समजू शकते. आणि जमीन अुत्पादनाचे मूलभूत साधन असल्यामुळेहि जमिनीपर्यंतच ही गोष्ट सीमित ठेवणे योग्य आहे असे वाटलें. क्रमाक्रमाने अेक अेक पाअूल अुचलणे अहिंसक प्रणालीच्या अधिक अनुरूप असल्यानें प्रथम भूमि-दान-यज्ञास सुरुवात केली.

पण जसजशी भूमि-दान-यज्ञ कार्याची प्रगति होअू लागली तसतशी संपत्तीचा हिस्सा मागितल्या शिवाय विचाराची पूर्ति होअू शकत नाही हीं गोष्ट अधिकाधिक स्पष्ट होत गेली आणि अखेर लोकाना त्यांच्या संपत्तीचा हिस्सा मी मागितला पाहिजे ह्या बाबत माझ्या मनाचा निश्चय झाला. लोकांनी आपल्या संपत्तीचा कमीत कमी सहावा हिस्सा द्यावा असें मला वाटतें. मग समजून अुमजून लोक जें देतील ते देवोत. जरी आम्ही आमच्या पुरुषार्थाने संपत्ति कमावली असली तरी ती आपल्यासाठी नसून, परमेश्वराने सर्वांच्या

अुपयोगासाठीं आपल्याजवळ ठेवली आहे अशी भावना या मागणीच्या मुळाशीं आहे. कारण ज्या पुरुषार्थ शक्तीने आपण संपत्ति कमाविली ती शक्ति देखील परमेश्वरानेच आपल्याला दिलेली आहे.

पद-यात्रेतील कार्यक्रमात मी पैसा घेणार नाही असे वारंवार सांगितले आहे आणि आता तर संपत्तीचा हिस्सा मागायला मी सुरुवात केलेली आहे. त्याचा मेळ कसा बसणार ? मी संपत्ति आपल्याजवळ ठेवणार नाही. संपत्ति सांभाळण्याची अगर तिच्या खर्चाची आणि हिशेबाची चिंता देखील मी करणार नाही असें त्याचे सरळ अुत्तर आहे कारण मी तर मुक्तच राहू अिच्छितों. लोकोपकाराच्या कामासाठी पुष्कळसे निधि जमविण्यांत येतात ह्या निधीचा कारभार सार्वजनिक समित्या बघत असतात. अशी व्यवस्था करण्याचाहि माझा विचार नाही. कारण वेळोवेळी निरनिराळ्या कामासाठी जमा करण्यांत येणाऱ्या फडांत आणि ह्या संपत्ति-दान-यज्ञात आणखी अेक महत्वाचा भेद आहे. तो असा की, ह्या यज्ञांत संपत्तीचा हिस्सा दरवर्षी द्यावा लागतो. म्हणूनच दात्याजवळच दान केलेली संपत्ति रहावी असे मी ठरविलें आहे. त्याचा विनियोग आमच्या आदेशानुसार तो करील आणि दरवर्षी हिशेब आमच्याकडे पाठवील. दान करणारा फक्त आपल्या संपत्तीचा हिस्साच देणार नाही तर आपल्या बुद्धीचा अुपयोग देखील समाजासाठी करील, असा याचा अर्थ आहे. आमच्या आदेशानुसार संपत्तीचा विनियोग करील असे मी म्हटले आहे, पण विनियोगाच्या बाबतीत दात्याला सूचना करता येतील.

× × ×

जर कमाअीच्या आकड्यांबाबत काही हिशेबाच्या अडचणी असल्या तर लोकांनी आपल्या कौटुंबिक खर्चाचा हिस्सा दिला तरी मी संतुष्ट होअीन. म्हणजे कुणाचे दहालाख रुपये बँकेत पडले असतील तर ते तिथेच राहतील पण तोजर त्यांतून दरवर्षी ५० हजार रुपये खर्च करीत असला तर त्याचा ५ वा हिस्सा म्हणजे अेकूण खर्चाच्या सहावा हिस्सा जरी त्याने संपत्ति-

दानांत दिला तरी पुष्कळ आहे. घरखर्चांत, मुलांचें शिक्षण, प्रवास-खर्च, आणि विवाह आदि सार्‍या बाबींचा अंतर्भाव होअील. कुणी जर सहावा हिस्सा देअू शकत नसतील तर त्यांनी आठवा, दहावा, हिस्सा दिला तरी चालेल. कारण आम्हाला कांही कर वसूल करायचा नाहीं. परंतु साठ हजार रुपये खर्च करणारा धनिक मनुष्य जर त्याचा १/१०० म्हणजे फक्त ६०० रुपये सालिना देण्याचें कबूल करील तर तें दान बेकार मानलें जाअील. आपल्या अिभ्रतीला शोभेल अितकें दान धानेकांनी दिलें पाहिजे. अशा तर्‍हेने सार्‍या हिंदुस्थानातील लोकांच्या घरखर्चाचा षष्ठांश अथवा अेक निश्चित अंश जर आम्हाला मिळाला तर संपत्ति-दानाचा मूलभूत विचार लोकांना कळला असें आम्ही समजू. कारण दरिद्रि-नारायणाला आपल्या घरात अधिकाराचें स्थान द्यावयाचें आहे हीच मुख्य गोष्ट आहे.

खर्चाचा हिस्सा देण्यात अेक अडचण अशी आहे की अेखाद्या वर्षी अेखाद्या व्यापार्‍याला तोटा आला तरी त्याला सम्पत्ति-दानातील आपला हिस्सा द्यावा लागेल. ज्याला हिस्याअैवजी सालिना निश्चित रक्कम द्यावयाची आहे, त्याच्यासाठी अशी योजना आहे की, ज्याने १०१ रुपये देण्याचें कबूल केले आहे त्याने ती रक्कम त्याच्या घर-खर्चाचा कितवा अंश आहे हें सांगितले म्हणजे आमचें काम झालें. दात्याने दिलेला हिस्सा त्याला शोभण्यासारखा आहे की नाही अेवढेंच ह्यांत आपल्याला बघावयाचे आहे.

कौटुंबिक खर्चाचा जरी अेक हिस्सा आपण घेतला तरी त्या खर्चाचा तपशिलवार हिशेब बघायची आपल्याला गरज नाही. त्या दात्याने आपला आकडा सांगितला तरी पुरे आहे. हिस्सा आपण घेत असल्यामुळें दरवर्षी रक्कम कमी जास्त होत राहील आणि अशा पद्धतीने दात्याला आजीवन दान देता येईल. निश्चित रकम जीवनभर देणे कठिण जाईल. हिस्सा देणें सोयीचे आहे.

× × ×

ह्या यज्ञांत भाग घेणारांनी आपल्या परिवारांतील सर्व लोकांशी चर्चा करावी. आणि सगळयांच्या संतोषाने आणि प्रेमाने ह्या यज्ञांत भाग घ्यावा. जर भक्तगण ह्या कामांत मदत करतील तर अेक जीवन-विचार म्हणून ही कल्पना साऱ्या देशभर पसरेल आणि साम्ययोगाच्या दिशेने समाज सहज जाअू लागेल.

मी ह्यांत दात्यांवर सर्व जबाबदारी टाकून त्यांच्यावरच विश्वास ठेवीत आहे हे अुघडच आहे. तार्किकांचा यावर आक्षेप येवू शकतो. पण विश्वास हाच धर्मबुद्धीचा आधार आहे. विश्वासानें जें संरक्षण मिळू शकतें तें कोणत्याहि कायदेशीर कारवाअीने मिळूं शकत नाही. ह्या दृष्टीने संपत्ति-दान-यज्ञाची ही पद्धति मी निश्चित केली आहे.

× × ×

जी कांही सम्पत्ति आहे ती सारी भगवंताची आहे, हा जो सम्पत्ति-दान-यज्ञाचा मुख्य विचार आहे तो आम्हाला स्थापित करावयाचा आहे. त्याचें साधन सम्पत्ति-दान हें आहे; साधन-दान नव्हे. साधन-दानामुळे आपल्या कार्यास मदत होणार असली तरी गरीब आणि अमीर आदि साऱ्यांना लागू होणारा मुख्य विचार सम्पत्ति-दानाचा आहे. ज्याला म्हणून खावे लागतें त्या सर्वांना तो लागू होणारा आहे. सम्पत्ति प्राप्त करतांना कुणावर अन्याय होअू नये, सम्पत्ति मिळविण्याचा मार्ग चुकीचा असू नये, चांगल्या मार्गानेच सम्पत्ति मिळवावी, अुचित किंवा जास्तीत जास्त हिस्सा समाजाला दिल्यानंतर अुरलेल्याचे सेवन करावे, आणि जे कांही सेवन करावयाचें आहे ते देखील अेक विश्वस्त म्हणून करावयाचें आहे ही सारी वृत्ति ह्यांत निहित आहे.

× × ×

अस्तेय आणि अपरिग्रह या दोहोंचा मेळ साधल्यावर अर्थशुचित्व पूर्ण होते. अर्थ–शुचित्वाशिवाय व्यक्ति आणि समाजाच्या जीवनांत धर्माची प्रतिष्ठा होऊ शकत नाही.

अर्थप्राप्तीच्या पद्धतीचें नियमन अस्तेयाने होते आणि तिच्या प्रमाणाचें नियमन अपरिग्रहाने होते. शरीराचा निर्वाह मुख्यतया शरीर-श्रमाने म्हणजे अुत्पादक-परिश्रमाने झाला पाहिजे असें अस्तेय म्हणतें. शरीर-श्रमाशिवाय खाल्लेल्या अन्नाने आम्ही अेक संकट निर्माण करतो.

जगातील पुष्कळशी वर्तमान विषमता, पुष्कळशी दु:खें आणि पापें, शरीर-श्रम टाळण्याच्या दानतींतून निर्माण झाली आहेत. तशी दानत असणारा अिसम प्रकट किंवा अप्रकट रुपात चोरी करीत असतो; म्हणून शरीर-श्रमद्वारा संपत्ति निर्माण करण्यावर अस्तेय व्रताचा अधिक जोर आहे.

आज आपल्या समाजांत चोरी हे पाप मानलें जात असले तरी काही लोक चोरी करीत आहेतच पण चोरी करणे चागले नाही अेवढें तर आपण मानलेंच आहे ना ! त्यामुळे ह्या अेका मूल्याची आपल्या समाजात स्थापना झाली आहे. पण चोरी प्रमाणेच संग्रह करणे देखील पाप आहे हे आता समजून घ्यावयाचें आहे. कारण ही दोन्ही पापेंच आहेत. त्यासाठी आपल्याला अस्तेय आणि अपरिग्रह ह्या दोन गोष्टी शिकाव्या लागतील. कजूष हे चोरांचे जनक असतात असें मी अनेक वेळ म्हटलें आहे. म्हणून जर कजूष आणि संग्रह करणारे नसतील तर चोरीच होणार नाही.

× × ×

## अपहरण आणि परिग्रह

मला जो विचार समाजात रूढ करावयाचा आहे, त्याविरुद्ध जो विचार आज समाजात रूढ आहे त्याला अपहरण म्हणतात. अपहरणाच्या विचारावर विश्वास ठेवणारे लोक अखेर व्यक्ति समाजासाठी आहे असे मानतात. त्यामुळें समाजासाठी व्यक्तीच्या संपत्तीचे परिहरण करण्यात कांही दोष नाही, अेवढेंच

नव्हें, तर व्यक्तीच्या संपत्तीच्या अपहरणाला विरोध करणारा विचारच चुकीचा आहे असे ते मानतात. आज जगांतील कित्येक देश ह्या विचाराकडे आकृष्ट झाले आहेत. पण त्याविरुद्ध मला अपरिग्रहाचा विचार रुजू करावयाचा आहे. सामान्यत: असें मानले जातें की, गांधीजी, विनोबा किंवा तत्सम संन्यासी लोकांसाठीच अपरिग्रह असून सामान्य जनतेसाठी तर परिग्रहच सांगितला आहे. त्यामुळे लोक संन्याशाचा आदर तर करतात, पण त्याना कोठें-कोठे तर घरात प्रवेश देत नाहीत. संन्यास हा अन्तिम आदर्श म्हणून मान्य करतात पण त्याच्या कौटुंबिक जीवनात परिग्रहच चालू असतो. धर्म-विचाराला अशा तऱ्हेनें खंडित केल्यानें त्याचा लाभहि अर्थात् मर्यादितच मिळतो. याचा परिणाम असा झाला आहे की लोभी मनुष्याचा सामना करतां-करता निर्लोभी देखील लोभी बनला आहे. क्षत्रियत्व नामशेष करण्यासाठी स्वत:च क्षत्रिय बनून आपल्या कामात अयशस्वी होणाऱ्या परशुरामाचे उदाहरण आपल्या समोरच आहे. म्हणून ज्याचा सामना करायचा आहे, त्याचेच शस्त्र जर आपण स्वीकारलें, तर त्याचे स्थूल रूप कदाचित् आपण नष्ट करू पण सूक्ष्म रूपात त्याला आपण अमर करुन ठेवू. आज साऱ्या जगात लोभाचे, परिग्रहाचें राज्य आहे. परिग्रहाच्या आवती भोंवती कायद्याचे असें आवरण उभें करण्यात आले आहें की परिग्रह ही चूक आहे असें मानलें जात नाही. त्यामुळें चोरी हा जरी आम्ही गुन्हा मानीत असलो तरी संग्रह करुन चोरीला प्रेरणा देणाऱ्याच्या कृतीला चोरी मानीत नाही. उपनिषदाच्या कहाणीतील एक राजा म्हणतो—' माझ्यां राज्यांत कोणी कंजूष नाहीं आणि म्हणून चोरहि नाही ' कारण कंजूषच चोर निर्माण करीत असतात. त्यामुळें चोराना तर आम्ही जेलमध्यें पाठवतो पण त्यांच्या पित्याना मुक्तच ठेवतो. ते शिष्ट आणि प्रतिष्ठित म्हणून गादीवर त्यांना स्थान मिळतें. हा कुठला न्याय ? गीतेंत देखील परिग्रही लोकाना चोर म्हटलें आहे. पण आम्ही तर गीतेला संन्यासाचें पुस्तक मानून तिच्यापासून संन्यास घेतला आहे.

× × ×

## अपरिग्रहांतील सांसारिक शक्ति

विशेषतः, अपरिग्रहात शक्ति देखील आहे की नाही हे आपल्याला पहायचें आहे. कारण अपरिग्रहात शुद्धि असल्याचें भान तर आम्हाला आहे पण त्यांत शक्तीहि आहे हे आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. त्यांत अुत्तम जीवनाला अुपयोगी सांसारिक शक्तीहि आहे. समजा गांधी-निधीत १० कोटि अैवजीं १०० कोटि रुपये गोळा झालें असतें तरी त्यामुळें विशेष काय झालें असतें ? आमच्या पद्धतीमुळें प्रत्येक घर ही अेक अेक बँक बनून जातें. आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या शक्तीला कांही सीमा नाही. आदान-प्रदानहि स्थानिक असल्यामुळें, ही अतिसुलभ योजना बनते आणि त्यातून अेक सामूहिक शक्ति, रचना आणि संघटना निर्माण होते. त्याग आणि समतेचे महत्व तर आपण मान्य केले आहे. पण ह्या साऱ्या शक्तीहि आहेत ह्या दृष्टीने आपल्याला आता विचार करावा लागेल, आणि ही गोष्ट समजून घ्यावी लागेल

× × ×

## समाजाय अिदम्

ज्याप्रमाणे यज्ञात आहुति देताना, 'अिंद्राय अिदम् न मम—हे माझे नाही, अिंद्रासाठीं आहे' असें म्हणतो, त्याचप्रमाणे आपण जे काही अुत्पादन करतो, मग ते शेतीतील असो की कारखान्यातील असो, त्याविषयी 'समाजाय अिदम्, राष्ट्राय अिदम्; न मम—हे सारे समाजासाठीं आहे, राष्ट्रासाठीं आहे; माझ्यासाठी नव्हें' असें म्हटले पाहिजे. आपल्याजवळ जे काही आहे ते सारे समाजाला अर्पण केलें पाहिजे; आणि त्यानंतर समाजाकडून जे काही आपल्या आवश्यकतेनुसार मिळेल तें 'अमृत' असेल.

लहानपणापासून आमच्यावर अनेकांचे अुपकार झाले आहेत. त्या ऋणातून मुक्त होण्यासाठी शरीर-परिश्रमाच्या मान्य मार्गाने जे आम्ही मिळविलें असेल, त्याचा हिस्सा समाजाला देणें आवश्यक झालें आहे. कारण यांत सम्यक्-विभाजनाचा अुद्देश असतो.

आम्ही सहावा हिस्सा मागतो म्हणजे (⅚) पाच सप्तांश संग्रह मान्य करतो काय ? आमच्या मान्य करण्याचा प्रश्नच नाही. तो भला गृहस्थ सहा भागिले सहा ⁶⁄₆ अितका संग्रह मान्य करीत आहे. त्यांतला ⅙ मागून त्याच्या ह्या मान्यतेला आम्ही धक्का देत आहोंत व त्याला आम्ही विचार करण्यासाठीं प्रवृत्त करीत आहोंत. 'ज्याने हरिनामाचा अेक वेळ अुच्चार केला त्याने मोक्षप्राप्तीसाठी कंबर कसली' असे भक्तांनी म्हटले आहे. ज्याने जीवननिष्ठा म्हणून ⅙ भाग समाजाला निरंतर अर्पण करण्याचा नियम मान्य केला त्याने आपली सगळी संपत्ति, आपलें सारें जीवन, अितकेंच काय पण आपला शरीर-निर्वाह देखील समाजाला अर्पण करण्यासाठीच कंबर कसली असे म्हणावे लागेल. संपत्ति-दान-यज्ञाकडे पाहण्याची ही दूरदर्शी दृष्टि आहे.

× × ×

## त्यागबंधन आणि भोगबंधन

पुष्कळांना, हा सहावा किंवा आठवा हिस्सा जन्मभरासाठी दान देणें कठिण वाटतें. परतु अेक वेळ लग्न केल्यानंतर आपण जन्मभरासाठीं बंधन स्वीकारीत नाही काय ? हिंदु-धर्माने सन्यासाची मोकळीक ठेवली असली तरी जो मनुष्य आमरण कौटुंबिक बंधनांत राहतों तो हें थोडेसें देण्याचे बंधन स्वीकारतांना मागेंपुढें कां पाहतो ? म्हणूनच शुद्ध विचार करणारांनी ही वस्तु आपल्या जीवनाचें अेक अंग आहे असें मानलें पाहिजे. ज्याप्रमाणें जीवनभर स्वच्छ हवा आणि स्वच्छ आहार आपण घेतो त्याचप्रमाणे जीवनभर आपल्या सम्पत्तीचा अेक हिस्सा आपल्याला लोकांना द्यायचा आहे. खरोखर तर सारेच्या सारेच दिलें पाहिजे. पण विश्वस्त म्हणून थोडेसे ठेवून अुरलेले सारे दिलें पाहिजे.

× × ×

आम्ही ही जी मालकी नष्ट करीत आहोत, हे घटनेच्या विरुद्ध आहे असे कांही लोक म्हणतात. पण घटना काय देवांनीं बनविली आहे ? जसजसा

माणसाचा विचार बदलेल तसतसे घटनेतहि बदल होतील. आम्ही अेखादी गोष्ट जबरीने लादीत आहोत असे तर नाही ना! समजावून सांगण्याचा आमचा हक्क आहे आणि समजून घेणें हे लोकांचें कर्तव्य आहे. आणि लोकांनी जर विचार समजून घेतला, तर त्यांनी घटनेचा विरोध केला, असा त्याचा अर्थ होईल काय? घटना तर नित्य विकासशील असली पाहिजे. मालकीची भावना मिटलीच पाहिजे. कारण आमच्या जवळ अधिक बुद्धि, अधिक शक्ति, अधिक महत्वाची कामें आहेत म्हणून आम्हाला अधिक पैसा मिळाला पाहिजे; हे जे पैशाचें जबाबदारीशी नातें जोडलें गेलें आहे तेच चुकीचें आहे असे मी मानतो.

ही गोष्ट ज्या मित्रांना पटेल, त्यांनी मग ते गरीब असोत की श्रीमंत असोत, भोगी सांसारिक असोत की त्यागी कार्यकर्ते, त्या सर्वांनी संपत्ति-दान-यज्ञाची स्वतः दीक्षा घ्यावी आणि या विचाराचे प्रत्यक्ष कृतीने अधिक संशोधन करावे अशी अपेक्षा आहे.

माझ्या कामाविषयी कोणत्याहि प्रकारचा गैरसमज करून घेअू नका. हा अेक धर्म-विचार आहे. मनुष्याला आसक्ति पासून मुक्त करून अपरिग्रही बनविण्याचा माझा अुद्देश आहे. म्हणून मोठमोठ्या परिग्रही लोकांजवळच दान मागायला जायचे असा याचा अर्थ होत नाही. कारण आसक्ति तर अेका लंगोटीत देखील असू शकतें; म्हणून प्रत्येक व्यक्तीजवळ जाअून विचार समजावून मागायचा आहे आणि दानपत्रें मिळवावयाचीं आहेत.

× × ×

संपत्ति-दान-यज्ञाचा विचार अधिक खोल आहे. भू-दान-यज्ञात आम्ही प्रत्येकाजवळून जमीन मागतो, मग दानपत्र लिहून घेतों, त्यावर त्यांची सही वगैरे घेतों, सरकार तें मंजूर करतें आणि त्यानंतर ते अमलात येते. अशी संपूर्ण योजना या यज्ञांत नाही. म्हणून दान-पत्र लिहून देणारा मनुष्य स्वतःच अंतरीच्या परमेश्वराला साक्षी ठेवून आपले वचन पाळील व हिशेब देईल

ठेवील. या दानाचा पूर्ण अुपयोग आमच्या आदेशानुसार करण्याची जबाबदारी देखील त्याच्यावरच आहे. भूमिसारखी अेकदांच दान देण्याची ही गोष्ट नाही. दरवर्षी आपला हिस्सा त्याला द्यावा लागेल. म्हणून त्याला आपले जीवन नैष्ठिक बनविण्याचे काम करावे लागेल. त्याच्या आंतरिक निष्ठेचा अुदय झाला पाहिजे.

× × ×

'सब संपत रघुपति कै आही' 'सगळी सम्पत्ति औश्वराचीच आहे' असे मानलें की, सहावा हिस्सा देण्याची गोष्ट गौण ठरते. खरोखर असे व्हावयास पाहिजे की, आपले सर्वस्व समाजाला देअून मग त्यांतून आपल्या शरीरासाठी थोडेसे घेतले पाहिजे. पण तूर्त समाजांत असल्या तऱ्हेची व्यवस्था नाही. व लवकरच तशी व्यवस्था होणारहि नाही. म्हणून आतां सहावा हिस्सा द्यावा आणि बाकी जे अुरेल त्यांतून अधिक देण्याचा विचार करावा. सहावा हिस्सा देण्याचा मतलब हा आहे की तो देण्याचा जीवनाचा निश्चय करावयाचा आहे. सहावा हिस्सा दिला नाही तर आम्ही पापी बनू आणि आमचे जीवन देखील पापमय बनेल म्हणून देणे कर्तव्य मानले पाहिजे. दुसरा किती देतो याची चिंता आपण करू नये. अुलट आम्ही स्वतः किती दिलें याकडे अधिक लक्ष दिले पाहिजे. कारण दुसऱ्याची परीक्षा करण्याची ही गोष्ट नाही. ही आत्मशुद्धीची आणि कर्तव्याची बाब आहे. हें आध्यात्मिक काम आत्मसंतोषाचे काम आहे अशा जाणीवेनें हा संकल्प केला पाहिजे.

× × ×

कुणी जरी जन्मभर आम्हाला सहावा हिस्सा देण्याचे वचन दिलें तरी त्यानी आमचा पूर्ण विचार मान्यच केला आहे असें मी मानणार नाही. कारण देणारा जर काही विशेष अुद्योग करीत असला तर त्यात काम करणाऱ्या साऱ्या लोकांचा आपल्या बरोबरच त्यात हिस्सा आहे आणि म्हणून साऱ्यांचा हिस्सा दिल्यानंतर जें अुरेल तें सेवा-कार्यांत लावावयाचें आहे हें जो समजून

घेईल त्यालाच संपत्ति-दानाचा विचार कळला असें आम्ही समजूं. अशा तऱ्हेने दान करणारा जें थोडें बहुत खात असेल तें सुद्धां आहुतिरूप होऊन तो यज्ञ होईल. अशा तऱ्हेने आपले सारे जीवनच यज्ञमय बनविण्याचा हा विचार आहे. प्रत्येकाने संपत्तीचें विश्वस्त बनावें अशी गांधीजीची तीव्रतर अिच्छा होती. गांधीचें तें स्वप्न ह्यातूनच पूर्ण होणार आहे. म्हणून मी त्याला आधुनिकतम व वस्तुतः खरेखुरे अर्थशास्त्र समजतों.

× × ×

### समानतेची कल्पना

कारखान्याचे मालक आणि मजूर ह्या दोघांचे हित परस्पर विरोधी कां मानले जावें ? अेक अखिल भारतीय मुलांची आणि दुसरी अखिल भारतीय पित्यांची संस्था आपण कधी पाहिली आहे काय ? आणि ह्या दोन्ही संस्था आपापल्या हित संरक्षणासाठी अेकमेकांच्यां विरोधांत काम करीत आहेत असे तरी आपण पाहिलें आहे काय ? आजतर शिक्षकाचे आणि विद्यार्थ्यांचे आपलें हित परस्पर विरोधी आहे अशा समजुतीनें वेगवेगळे संघ बनतात.पण ही सारी विपरीत बुद्धि आहे ही सारी आसुरी संपत्तीची लक्षणे आहेत. म्हणूनच शारीरिक श्रम करणारेहि आपल्या संपत्तीचें सहभागी आहेत हा विचार आपल्याला संपत्तिवानांना समजून सांगायचा आहे.

व्यापारात जशी भागीदारी असते तशी मजूर आणि मालकांची भागीदारी का असू नये ? पण मी समानतेची गोष्ट करीत आहे हे अुघड आहे. आपण खेड्यातून खूप-खूप मिळविलें आहे; तेव्हा खेडुतांना देखील आपल्या संपत्तीचा अेक हिस्सा द्यायचा आहे असेच मी शहरवाल्यांना समजावून सांगतो. अेकदाच दान देअून मोकळे होण्याचा संपत्तिवानांनी विचार करू नये. धर्म-कार्यांतून सुटून जाण्याची कुणाची अिच्छा नसतें. पापकार्यांतून मुक्त होण्याची मात्र प्रत्येकाची अिच्छा असतें. हें काय पाप-कार्य आहे म्हणून आपण त्यातून मुक्त होअू अिच्छितां ? असें मी संपत्तिमान लोकांना विचारीत असतो. हे तर धर्म-कार्य समजून वारंवार-नव्हें-जन्मभर करायचें आहे. लोक म्हणतात हे फार

कठिण काम आहे. पण मी म्हणतो की ते तसें नाही. मी दरमहा पचवीस रुपये जन्मभर देईन असें अेक जण म्हणाला. मी त्याना म्हटले की हे बरोबर नाही. कारण अुद्या जर आपण दरिद्रि झालांत तर आपल्याला आपली प्रतिज्ञा मोडावी लागेल. पण निश्चित रकमे अैवजीं जर आपण सहावा किंवा अन्य कोणता हिस्सा देण्याचे कबूल केलें तर जन्मभर आपल्या प्रतिज्ञेचे पालन करणे आपणांस शक्य होअील. मग आपल्याला अर्धी पोळी खायला मिळाली तर त्याचाहि सहावा हिस्सा आपण देअू शकाल. अशा तऱ्हेने आपण जर माझा विचार समजून घ्याल तर आपल्याला त्याचे ओझें वाटणार नाही कारण माणसाला जसें आपल्या शरिराचें ओझें वाटत नाही तसेंच धर्माचेहि वाटूं नये. धर्म-विचार हा जीवन-दायी विचार असतो.

× × ×

भूमि-दान-यज्ञा-अितकाच संपत्ति-दान-यज्ञहि व्यापक आहे. जमीन प्रत्येका जवळ नसते. परन्तु संपत्ति प्रत्येकाजवळ असतेच. जमीन संपत्तीचाच अेक प्रकार आहे. संपत्तींत बुद्धि, शक्ति, पैसा आदि सगळे काही येते.

कुणाजवळ संपत्ति कमी असली तरी त्याने आपल्या अपुऱ्या अन्नातून थोडेसे अन्न गरिबासाठी द्यावे असे मी अिच्छितों. आमच्या घरांत आणखी अेकाला प्रवेश दिला असा त्याचा अर्थ आहे. म्हणून ही फार विचारपूर्वक करण्याची गोष्ट आहे. म्हणजे प्रत्येकाला आपले जीवन थोडेसे कमी खर्चाचे करावे लागेल. पुष्कळांना तर आपल्या पोटाला पीळ देअून थोडेसे द्यावें लागेल. तो आपल्या कुटुंबाचा खर्च तर चालवीलच, पण त्याच बरोबर दरिद्रि नारायणाची देखील आठवण ठेवील. हा अेक धर्म-विचार आहे आणि समजून अुमजून तो अमलांत आणावयाचा आहे. हिन्दुस्थानांत दानाची परंपराच चालत आलेली आहे. भुकेल्याला खाअू घातल्यानंतर स्वतः खायचें याला आज दान म्हणतात. अशीच आमची खानदान आहे. पण आज हें थोडेसे कमी झाले आहे. आणि शहरांत तर फारच कमी झालें आहे. पण जे गुण आजपर्यंत व्यक्तिगत स्वरूपात होतें त्यांना आता सामाजिक रूप द्यायचे आहे, असें मी म्हटलेले आहे.

काही गुणाचा विकासच झालेला नाही म्हणून आपल्याला आता तेंच काम करायचे आहे. दया ह्या गुणाचा विकास झाला होता. पण दुसऱ्याचें दुःख सहन होत नाही, पाहवत नाही म्हणून काहीतरी देण्याची प्रेरणा होणें, असा दयेचा अर्थ होता. अशावेळी काहीतरी मदत करण्याची स्फूर्ति आपोआपच होत असे. हेंच आजवर दयेचे स्वरूप होतें परन्तु आता दया हे नित्य जीवनाचें अेक अंग बनवायचें आहे. ज्याप्रमाणे आपण रोज स्नान करतो त्याचप्रमाणे काही विचारहि रोज अमलांत आणायचे आहेत. आपलें शरीर घाण झालें तरच स्नान करायचें असा विचार माणूस करीत नाही. पण तो रोज स्नान करीतच असतो. दयेला व्यापक केली की तिचा विकास होतो. आपल्या भावावर आणि मुलावर आपण दया करतो काय? आपण तर त्याचा हक्क मान्य करतो आणि त्यांना हवें असेल तें देतो. म्हणजे ही रोज करण्याची गोष्ट आहे. कारण दयेला सार्वजनिक रूप दिलें की दुसऱ्याची चिंता करण्याचा भाव त्यात आलाच.

म्हणून जर समत्व अमलात आणलें तर दया येअीलच. दयेला सार्वजनिक रूप द्यायचे म्हटले की समत्व आणि समविभाजन आलेच.

× × ×

## सम्पत्ति-दानाचे स्वरूप

सम्पत्ति-दान-यज्ञात अेखादा फंड जमविण्याची कल्पना नाही हे आपण ध्यानात ठेवलें पाहिजे. ह्या यज्ञाचे हेच वैशिष्ट्य आहे. जर अेखाद्या ठिकाणी निधि जमवायची कल्पना असती तर मी त्याला यज्ञ म्हटलें नसते. कारण 'यज्ञ' शब्द मी अुगीचच जोडला नाही. समजून-अुमजून तो शब्द जोडलेला आहे. त्यामुळें हा अेक असा विचार झाला आहे की त्यातून कुणीच सुटू शकत नाही. प्रत्येकाला त्यात आहुति टाकण्याची संधी मिळते. जें धर्म-कार्य, सत्यासारखें सार्यांना लागू होतें, जे अक्षरशः सार्वजनिक आहे म्हणजे सर्व लोकांसाठी आहे; त्यालाच मुख्य-धर्म अथवा प्रथम-धर्म म्हणतात.

'यः तानि धर्माणि प्रथमानि आसन्।'

तर सम्पत्ति-दान-यज्ञ आजकालच्या अितर निधीपेक्षां सर्वस्वी वेगळा आहे. त्यांत आम्ही दान-पत्र घेतो; पैसा नव्हें. दानाचा विनियोग दाता स्वतःच गरिबांच्या सेवेसाठी करतो. दाता देखील पैशाच्या रूपाने गरिबांना मदत करणार नाही. काही लोकानी पैशाचा दुरुपयोग होअील अशी शका प्रगट केली आहे, व ती योग्यहि आहे. पण सम्पत्ति दानात तर अेखाद्या व्यक्तीसाठी सम्पत्तीचा अुपयोग होणारच नाहीं. सामुदायिक कामांसाठी मात्र त्याचा अुपयोग होअील. जसे विहिरीसाठी सिमेंट खरेदी केलें किंवा दोन तीन शेतकरी मिळून अेक बैलजोडी घेअून दिली. पण तो किसान बैलजोडी विकूनहि त्या पैशाचा दुरुपयोग करील ही कल्पना अतिरजित आहे. आमच्या सद्भावनेने त्याच्याहि हृदयांत सद्भावनेचा अुदय होअील, अशा श्रद्धेनें आम्ही काम करीत आहोत. ही काही 'अधश्रद्धा' नव्हें; ही 'अनुभव-श्रद्धा' आहे. गावोगाव जाअून घरोघरचा सहावा, आठवा किंवा दहावा हिस्सा आम्ही मागू तेव्हां त्याचवेळी त्याच्याजवळून आम्ही पैसा तर घेणार नाही. लोक धान्य देतील किंवा अन्य वस्तू देतील ह्या सार्‍या वस्तू देखील समूहाला मिळतील, गावाला मिळतील. आणि अशा तर्‍हेने गावोगांव सामूहिक लक्ष्मी अेकत्र होअील. अियें मी पैसा किंवा सम्पत्ति हा शब्द वापरला नाही. कारण त्यामुळें गैरसमज होण्याचा संभव आहे. अुदाहरणार्थ अेखादा सुतार पांच नांगर तयार करुन देअील, अन्य लोक दूसरी साधने देतील, आणि हे सारे मिळून अेक सामूहिक लक्ष्मी बनेल. तर हीच गोष्ट मी खेड्यांत आणि शहरात सांगत आहे. मी शहरवाल्यांना म्हणेन, तुमच्या सम्पत्तीत दुसर्‍याचाहि हिस्सा आहे, तुम्ही स्वतःला सम्पत्तीचें मालक कां समजतां ? तुम्ही तर आपल्या सम्पत्तीचें अेक भागीदार आहात. तुमच्यांत आणि समाजांत विरोध आहे असें तरी आपण कां मानतां ?

## दात्याच्या वचनावर विश्वास

'विनोबांना जमीन नको, सम्पत्तीहि नको, त्यांना तर फक्त दानपत्राचें कागद पाहिजेत; हा फक्त कागद मागणारा देव आहे. फुलाने संतुष्ट होणाऱ्या

देवांना जशी आपण फुलाची माला अर्पण करतो तशीच ह्याच्या गळयांतहि दान-पत्रांची माला टाका 'आणि सुशाल 'खरचत नहीं गठरी भजो रे भैया राम गोविंद हरी' असा अनुभव घ्या' अशी टीका अेका वर्तमान-पत्रकाराने माझ्यावर केली होती. टीकाकाराची ही व्यंगोक्ति होती पण वस्तुस्थितीहि अशीच आहे. आमच्या हृदयांत दात्याच्या पैशापेक्षा त्याच्या वचनाची कितीतरी अधिक किंमत आहे. सम्पत्ति-दानांत मिळालेल्या सम्पत्तीचा विनियोग कसा करायचा ह्या संबंधी मी निर्देश देणार आहे हेंच सपत्ति-दानातील खरे संरक्षण आहे. परंतु जेव्हा करोडो दान-पत्रें मिळतील तेव्हा अशा तऱ्हेनें निर्देश देणें देखील अशक्य होअील. त्यावेळी आपोआपच वितरण होअून जाअील.

## सम्पत्ति-दान-यज्ञ-मार्गदर्शन

(१) सम्पत्ति-दानाची रकम प्रत्येकाला आपल्याजवळच ठेवायची आहे, किंवा आपल्या परिचित लोकाजवळ ठेवायची आहे.

(२) जो हिस्सा द्यायचा आहे तो जीवनभर द्यायचा असल्याने परिवारांतील जबाबदार लोकाच्या अनुमतीने हे काम करायचे आहे.

(३) कर्जदार ह्यांत भाग घेअू शकत नाही. कारण कर्ज-मुक्त होणें हे त्याचे पहिलें काम आहे.

(४) सम्पत्तीचा विनियोग माझ्या सूचनेनुसार करायचा आहे. ह्या साऱ्या योजनेतील हे फार मोठे सरक्षण आहे.

(५) सम्पत्ति-दान-यज्ञात ज्यावर्षी जितकी रकम मिळेल तितकी त्याच वर्षी खर्च केली जाअील. बाकी शिल्लक ठेवण्याचे कारणच नाही. आपल्या देशात अितके विशाल काम करायचे आहे की, कितीहि रक्कम मिळाली तरी ती सर्व सहज खर्च होणार आहे.

(६) सध्या सम्पत्तीचा विनियोग मुख्यतः खालील तीन बाबीसाठी करण्याचा विचार आहे.

(अ) ज्या भूमि-हीन किसानांना जमीन दिली जाअील त्यांना बी-बियाणे, बैल, विहीर आदिसाठी मदत करणें.

(आ) त्यागी सेवक-वर्गाला अल्पतम सेवा-धन देणें.

(अी) सत्साहित्याचा प्रचार करणें.

(७) सम्पत्ति-दान-यज्ञांत हिस्सा देणाऱ्या व्यक्तीचा जीवन-परिचय मला हवा आहे. म्हणून ह्या यज्ञात सम्मिलित होण्याची अिच्छा असणाऱ्या लोकांनी आपला अल्प परिचय मला पाठविला पाहिजे.

---

## विभाग तिसरा

# सम्पत्ति-दान-यज्ञ

( श्रीकृष्णदास जाजू )

### प्रास्ताविक

आतां देशभर सर्व लोकाना भू-दान-यज्ञाचा परिचय झाला आहे. कार्यकर्ते भू-दान-यज्ञासाठीं जमीन मागायला जेव्हा जमीनदारांकडे जात तेव्हां कांही जमीनदार खालील प्रश्न विचारीत असत. जशी आमच्या कडून जमीन मागता तशीच जे श्रीमत लोक आहेत आणि ज्याच्याजवळ कोटयावधि रुपयाची सपत्ति पडलेली आहे त्याच्याकडून त्यांच्या सपत्तीचा हिस्सा कां मागत नाही ? वास्तविक भू-दान-यज्ञाच्या गर्भांतच संपत्ति-दान-यज्ञ होता. पण आतापर्यंत त्याने प्रकट रूप घेतलें नव्हते. दोन्ही यज्ञांपैकी प्रथम केवळ भू-दानाचा प्रारंभ का झाला याचा खुलासा पू० विनोबाजीनी अनेक वेळां केला आहे शिवाय जमिनीचा प्रश्न कांही विशेष आणि निराळाच असल्याचे प्रत्येकाला माहीतच आहे. ईश्वराने जमीन निर्माण केली आणि मनुष्यहि निर्माण केला. मनुष्याच्या जीवनाचा आधार जमीनच आहे. पण शरीर-श्रम करून त्यातून काही निर्माण केलें तरच आजीविका होऊ शकते. हवा आणि पाण्यावर कुणाची व्यक्तिगत मालकी असणें न्याय्य नाही. जमीन समाजाची मानली पाहिजे. मनुष्याने जमिनीवर मेहनत करून आपले जीवन चालवावें आणि जो असले शरीरश्रम करील त्याला त्याच्या श्रमाचा योग्य मोबदला मिळावा असा ईश्वरी संकेत आहे. पण माणसाच्या अयोग्य करणीनें, जे जमीनीवर श्रम करीत नाहीत त्यांच्याजवळ आज मोठ्या प्रमाणांत जमीन एकत्रित झाली आहे. आणि जे जमीन कसतात किंवा कसूं इच्छितात त्याच्यापैकी पुष्कळांच्या जवळ आपल्या निर्वाहाइतकी देखील मालकी हक्काची जमीन नाही. त्यामुळे त्यांना आपल्या श्रमांतून मिळणाऱ्या मोबदल्याचा एक मोठा हिस्सा तथाकथित जमीन मालकांना देऊन टाकावा लागतो.

म्हणून भूमिहीनांना भूमि देण्याचा प्रश्न प्रथम हाती घेणे अुचितच होतें. पुष्कळशी कामे अेकाच वेळी हाती घेतल्याने अेक काम देखील पूर्ण होत नाही. कारण मनुष्याची शक्ति मर्यादित आहे. म्हणून अेक काम घेअून त्याच्याच मागें लागल्याने तें काम सफल होण्याची आशा बाळगतां येते. आतां ज्या अर्थी भू-दान-यज्ञाच्या कामाची पुष्कळच प्रगति झाली आहे, भू-दानाचे काम यशस्वी होणार आहे ह्या विषयी शंका राहिलेली नाही, अशा स्थितीत भूमि प्रमाणेंच अितर संपत्तीहि व्यक्तिगत मालकीची न मानतां समाजाच्या मालकीची मानली जावी ही गोष्ट आपल्या समोर येते म्हणजेच भू-दानाच्या बुडाशी असलेला विचार अन्य प्रकारच्या संपत्तीलाहि लागू झाला पाहिजे. ह्याशिवाय ज्यांना यज्ञांतील जमीन दिली जात आहे त्यांना साधन सामुग्री मिळवून देण्यासाठी धनाची आवश्यकता आहे. वेळ येताच संपत्ति-दान-यज्ञाचें धर्म-चक्र-प्रवर्तन देखील भू-दान-यज्ञा-प्रमाणेच जोराने फिरायला लागेल हे अुघड आहे. म्हणून विनोबांनी या विषयी जी कांही प्रवचनें दिली आहेत त्यांचा सखोल अभ्यास करणें आवश्यक आहे. या पुस्तिकेत सुरुवातीला त्याच्या प्रवचनांतील कांही भाग दिला आहे मी काही ठिकाणी भू-दान-यज्ञ प्रचारासाठी गेलो होतो तेव्हा भू-दाना-बरोबरच संपत्ति-दान-यज्ञाविषयी माझ्या मनात जे विचार आले ते संक्षेपाने या पुस्तिकेत मांडण्याचा प्रयत्न करीत आहे. विशेषत: श्रीमंत लोकांसाठी माझें निवेदन आहे. साधारणपणें चालत आलेल्या परंपरेलाच आम्ही योग्य मानतो. तिच्या मुळाशीं जाण्याचा प्रयत्न करीत नाही. तिच्या मुळाचा शोध केला तर कदाचित् स्वतःच्याच विवेकाने आतापर्यंत आपण जे मानीत आलों तें किती चुकीचें आहे हे कळेल. संपत्ति कमाविणे, ती आपल्याजवळ ठेवणें, आणि तिचा अुपयोग करणें या विषयी आमचें जे विचार बनले आहेत ते कितपत बरोबर आहेत ? याचा त्यानी स्वतः विचार करावा अशी आशा बाळगून श्रीमंताच्या समोर त्याच्या चिंतनासाठी काही विचार मी ठेविलें आहेत. असल्या प्रकारच्या मनोमथनातूनच मनुष्य आपली आध्यात्मिक प्रगति करीत असतो.

## 'दान' आणि 'संपत्तीचें' स्वामित्व

या यज्ञात 'दान' या शब्दाचा अुपयोग केला आहे. त्याचा अर्थ समजून घेणे आवश्यक आहे. अेक माणूस दुसऱ्याची दया येअून जे कांही देअील किंवा स्वतःच्या पारलौकिक कल्याणासाठी जो कांही खर्च करील तें दान असा आजपर्यंत दान या शब्दाचा अर्थ होता. श्रीमद्‌शंकराचार्यांनी 'दाना' चा अर्थ 'संविभाग' केला आहे, असे विनोबाजींनी दाखविलें आहे. संविभाग म्हणजे सम्यक्-विभाग; म्हणजेच योग्य वितरण; जसें संयुक्त कुटुंबांत भावाभावात हक्काने योग्य वितरण होत असतें, ह्या अर्थी विनोबा ह्या शब्दाचा प्रयोग करीत आहेत. ज्या वस्तूचे दान करावयाचे त्या वस्तूचा दाता मालक असून ती वस्तू आपल्या जवळ ठेवण्याचा त्याला अधिकार आहे असे प्रचलित दान या शब्दाच्या अर्थात गृहीत धरले जात असे. पण आपल्याजवळ गरजेपेक्षा जी अधिक जमीन आहे तिच्यावर आमचा अधिकार नाही असा भू-दान-यज्ञाचा आशय आहे. अनेक कारणांनी ती आमच्याजवळ आली. आतांपर्यंत ती स्वतःजवळ ठेवण्याची चूक आपण केली आहे. म्हणून ही चूक आतां दुरुस्त करावयाची आहे. त्याच प्रमाणे ज्या भूमिहीनांना जमीन दिली जाते त्यांनी दैन्य आणि दारिद्र्यामुळे ज्या वस्तूवर आपला अधिकार नाही ती वस्तू (जमीन) आपणास अितराच्या मेहेरबानीने मिळत आहे असे समजूं नये. अुलट जमीन मिळण्याचा आपला हक्क आहे असे समजून जमिनीचें दान स्वीकारावें.

### अधिकारांत अनधिकार कसा ?

सम्पत्ति विषयक प्रचलित विचार प्रणालीकडे पाहिलें की वरील विधान जरा विचित्रच वाटतें. मी कुणाची चोरी केली नाही, अुपलब्ध कायदेशीर साधनाचा अुपयोग करून धन कमाविले, मी स्वतः शारीरिक अगर बौद्धिक परिश्रम करून सम्पत्ति कमाविली असे सम्पत्तीचा मालक समजतो. त्यामुळें

त्या सम्पत्तीचा अुपभोग घेण्याचा माझा अधिकार आहे. हा माझा अधिकार कायद्याने मान्य केला आहे, तो समाज मान्य तर आहेच; अशी स्थिति असतांना त्या सम्पत्तीवर माझा अधिकार नाही ही गोष्ट पटत नाही. त्याचप्रमाणे दान घेणाऱ्या व्यक्तीने ती जमीन अगर संपत्ति कमविण्यासाठी काहीच परिश्रम केले नाहीत, तिच्याशी त्याचा कधी संबंधहि आला नाही व त्याला कोणत्याही प्रकारचा कायदेशीर अधिकार तर नाहीच, अशी स्थिति असतांना त्याचा तिच्यावर अधिकार आहे ही गोष्ट कशी पटणार ? केवळ कल्पनेनें व्यावहारिक कार्य कसें साधू शकेल ? ज्या अधिकाराचे समर्थन कायदा देखील करीत नाही असा काहीच न मिळविणाऱ्या माणसाचा कुण्या अेका वस्तूवर हक्क कसा असू शकतो ?

## कायदा आणि मान्यतेपेक्षां न्याय श्रेष्ठ आहे

या प्रश्नाचें अुत्तर द्यायचे झाल्यास कायदा आणि रूढीचें मूल्य ठरविले पाहिजे. कायदा आणि रूढीशिवाय न्याय नांवाची अेक सर्वश्रेष्ठ वस्तु आहे हें आपण विसरूं नका. न्यायाचा अधिकार कुणीच नष्ट करूं शकत नाही. कारण त्याचे मूळ माणसाच्या अंतरङ्गांत, आत्म्यात आणि त्याच्या सद्सद्-विवेक बुद्धीत असते विशिष्ट कालातील कायद्याची किंवा समाजाची धारणा योग्य असतेच असें नाही हें आपण लक्षांत ठेवले पाहिजे. बहुशः प्रचलित परंपरेनुसार कायदा बनत असतो. समाज-मान्यता देखील रूढीचे अनुशीलन करीत असते. समाज-मान्य किंवा कायदेशीर असणारी कोणतीहि गोष्ट न्याय्यच असेल असें म्हणतां येत नाही. दीर्घकालीन अितिहासाच्या परीक्षणावरून अेका काळांत ज्या मान्यता योग्य मानल्या जात असत त्यांत काही काळानतर आमूलाग्र परिवर्तन झाल्याचें दिसून येतें. समाज मान्यता बदलल्याबरोबर त्यानुसार कायदा देखील बदलला. जोंवर मान्यता चालत आली तोपर्यंत तिच्या योग्यते-विषयीं कुणाच्या मनांत शंका देखील आली नाही आणि थोडे लोक त्याविषयीं साशंक असले तरी त्यांचा त्यावेळच्या विचार प्रणालीवर काहीच प्रभाव पडला

नाही. काही कालानंतर विवेक जागृत झाला. आज आपण मानीत असलेली गोष्ट अतिशय अन्याय्य असल्याचे मनुष्याच्या निदर्शनास आले आणि अखेर परिवर्तन झालेंच. मान्यता बदलल्यानंतर राजसत्तेला कायदा बदलणे भाग पडते. कारण राजसत्ता जर तसें करणार नाही तर ती टिकू शकत नाही. विवेक-जागृति नंतर म्हणजेच चूक कळल्यानंतर, मान्यता कितीहि जुनी आणि व्यापक असली तरी ती बदलावीच लागते. उदा:—गुलामीची प्रथा हजारो वर्षेपर्यंत साऱ्या जगात चालू होती. त्या लांब मुदतीत अनेक विद्वान, तत्ववेत्ते आणि साधुसंताचें वास्तव्य होते तरी ती चालूच राहिली. अेका नामांकित तत्ववेत्याने देखील तिचे समर्थन केलें होतें. गुलामाना ही प्रथा आपल्याच हिताची आहे असें वाटत होतें. तरीहि मानवी विवेक जागृत झालाच. आपल्या-सारखाच हाडामासाचा आणि सुखदुःखाची समान भावना असणाऱ्या माणसाला दुसऱ्या सशक्त आणि धनवान माणसाने गुलामीत जखडून ठेवणें न्याय्य आहे काय ? असा प्रश्न समोर आला हा प्रश्न सोडविण्यासाठी आपसात लढाया झाल्या आणि अखेर गुलामीची प्रथा नामशेष झालीच. असेंच राज्यसत्तेच्या बाबतीत घडलें. साऱ्या जगात हजारो वर्षे व्यक्तीचे-राजाधिराजाचे-राज्य चालले. आपल्या हिंदुस्थानात तर 'नाविष्णुः पृथिवी-पतिः' अशी मान्यता होती. पण अखेर अेका व्यक्तीला करोडो लोकाना आपल्या हुकुमाखाली राबविण्याचा अधिकार आहे काय ? असा प्रश्न निर्माण झाला. हा प्रश्न सोडविण्यासाठीं घनघोर लढाया झाल्या सेकडोवर्षे कुठे ना कुठे संघर्ष चालू राहिला, असंख्य लोकाना असह्य यातना सहन कराव्या लागल्या आणि अखेर राजसत्तेचा अंत होअून राज्यसत्ता लोकांच्या हातात आली. अजूनहि काही

ठाणी लोकशाहीच्या नावावर काही व्यक्ति आपली अनियंत्रित सत्ता चाल-विण्याचा प्रयत्न करीत असतात. परन्तु त्याची सत्ता सगळ्यांच्या डोळयांत सलते. आणि म्हणून शेवटी तिचा अंत होअील्च असे निःशंकपणे मानलें पाहिजे. आपल्या येथील अस्पृश्यतेबाबतहि असेच घडलें. आम्ही अस्पृश्यतेला धार्मिक

देखील मानलें आणि आतां ती अस्पृश्यता कायद्याने दडनीय ठरविली आहे. अशीं अनेक अुदाहरणें देता येतील. वेळोवेळी विचारात मोठमोठे बदल झाले व हजारो वर्षे चालत आलेल्या मान्यता सोडून द्याव्या लागल्या. सपत्तीच्या मालकी हक्कांबाबत असेच काहीतरी झालें आहे.

## संपत्ति कशी बनते ?

सम्पत्ति कशी बनते याबाबत थोडासा विचार करणें योग्य होअील. रुपये, नोटा, सोन्या-चादीचीं नाणी म्हणजे सपत्ति ही समजूत चुकीची आहे. ही तर सपत्ति मोजण्याची फक्त साधनें आहेत. कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत माणसाच्या अुपयोगात येणाऱ्या वस्तु म्हणजेच सपत्ति. त्यांतील कांही वस्तूशिवाय माणूस जिवतच राहू शकत नाही आणि कांही वस्तु त्याच्या सुखसोयीच्या आणि त्याला आराम देणाऱ्या आहेत. अन्न, वस्त्र आणि घर या माणसाच्या प्राथमिक गरजा आहेत. माणसाचा निर्वाह त्यांवाचून होअू शकत नाही. याशिवाय दुसऱ्या अनेक वस्तूवाचून माणसाचें निभूं शकतें. तर सपत्तिरूपी या वस्तू बनतात कशा ? त्या आपोआप तर निर्माण होतच नाहीत किंवा आकाशातूनहि त्याचा पाअूस पडत नाही. जन्मतःच त्या गोष्टी कुणी आणीतहि नाही. अुलट जन्मल्याबरोबर कांही गरजाच निर्माण होतात आणि त्या पूर्ण करण्यासाठी मनुष्याची सतत धडपड चालू असते. नैसर्गिक नानाविध द्रव्यांचा अुपयोग करण्यासाठी माणूस जे परिश्रम करतो, त्यातून ह्या गरजेच्या वस्तु निर्माण होतात. म्हणजेच सपत्ति निर्मितीची दोन-साधने नैसर्गिक द्रव्य व माणसाचे परिश्रम ही आहेत. यंत्रांनी कांही वस्तु निर्माण होतात असे वाटते. पण ती यत्रे सुद्धां शरीर-श्रमानेंच बनतात व ती वापरण्यासाठी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष माणसाच्या शारीरिक श्रमाची गरज असतेच. केवळ बौद्धिक श्रमानें कोणतीहि गरजेची वस्तु *निर्माण होअु शकत नाही; म्हणजेच शरीर-श्रमाशिवाय संपत्ति* निर्माण होअु शकत नाही. पण शरीर-श्रम करणारांना सपत्तीच्या मालकी-

हक्कांत कितपत स्थान आहे ? जे प्रत्यक्ष शरीर-श्रम करतात, त्यांना तर दरिद्रि आणि कष्टमय जीवन कठावे लागतें व त्यांच्या श्रमाने अुत्पन्न झालेली संपत्ति काही थोडया लोकांच्या हातात अेकत्रित होत जाते. श्रमणाऱ्या लोकांनी निर्माण केलेल्या वस्तु व्यापाऱ्यांच्या किंवा अितर लोकांच्या हातांत जातात; आणि त्याच्या देवघेवीनें कांही लोक श्रीमत बनतात. वर्षभर श्रम करून धान्य निर्माण करणाऱ्या शेतकऱ्याच्या प्राथमिक गरजा देखील पूर्ण होत नाहीत. आणि तेंच धान्य व्यापाऱ्याच्या जवळ गेलें की, त्याच्या बळावर त्याला श्रीमंत होतां येते. ज्या मजुरांच्या श्रमांशिवाय कारखाना चालूच शकत नाही त्याना विशेष प्राप्ती होण्याची आशा नाही. जर मजूर योग्यता संपादन करतील तर धनिक आणि व्यवस्थापकांशिवाय कारखाना चालू शकतो. केवळ धनिक अगर बुद्धिमानापैकी कुणीहि स्वतः तर कारखाना चालवूच शकत नाही आणि तरीहि श्रीमत आणि व्यवस्थापकाना त्या श्रमणाऱ्या मजूरापेक्षां कितीतरी पट अधिक पैसा मिळतो. मजूर संपत्ति निर्माण करतात आणि मजूरी न करणाऱ्या पण मजूर आणि मजूरीचा तिरस्कार करणाऱ्या लोकाजवळ संपत्ति साठते अशाच पद्धतीने संपत्ति काही थोडया लोकांजवळ अेकत्रित होते ह्या थोडया लोकाची संख्या फार तर शेकडा १० असेल पण श्रमणाऱ्या मजूराची संख्या मात्र जवळजवळ शेकडा ९० असते या श्रीमतांच्या संपत्तीचे मूळ पाहिलें तर ते श्रमिकांच्या श्रमांतच सापडते श्रीमतांजवळ असणारा पैसा श्रमणाऱ्या गरिबांच्या खिशातून आला आहे गरिबाना त्याच्या श्रमाचा पूर्ण मोबदला मिळत नाही अर्थात् गरिबाच्या अधिक गरीब बनण्यावर श्रीमताची संपत्ति वाढते आणि या संपत्तीवरच त्याची मालकी आहे असें मानलें जाते. कायदा आणि सामाजिक मान्यता कांहीहि असली तरी ही स्थिति न्यायोचित आहे काय ?

## श्रम-जीवि आणि बुद्धि-जीवि यांत श्रेष्ठ कोण ?

आपण या दिशाणी वरील प्रश्नाचा विचार करू. अुदर निर्वाहासाठी किंवा पैसे कमाविण्यासाठी अनेक धंदे चालू आहेत. या धंद्यांचे साधारणपणे

दोन वर्ग करता येतील. शरीर-श्रम प्रधान आणि बौद्धिक-श्रम प्रधान. पहिल्या प्रकारच्या धद्यांना आपण श्रमजीवियांचे आणि दुसऱ्या प्रकारच्या धंद्यांना बुद्धिजीवियाचे धदे म्हणू. राज्यकारभार करणारे मंत्री आणि सर्वांत वरच्या अधिकाऱ्यापासून तों अगदी कनिष्ठ कारकुनापर्यंत सगळे सरकारी नोकर, न्यायाधीश, वकील, डॉक्टर, अध्यापक, व्यापारी अित्यादि धदेवाले आपलें भरण पोषण केवळ बौद्धिक श्रमावर करितात. त्याचप्रमाणें शेतकरी आणि मजूर, सुतार, गवडी, लोहार, चाभार, भगी, अित्यादि दुसऱ्या वर्गांतील लोक शरीर-श्रमावर आपला निर्वाह करतात. समाजाला या बुद्धि-जीवि व श्रम-जीवि, दोन्ही प्रकारच्या धद्याची गरज आहे. पण सामाजिक दृष्टीने या दोन प्रकारच्या धद्यांच्या मूल्यांत भयकर तफावत आहे. असेहि म्हटले जाते कीं, जसें, कांही लोकाना शरीर-श्रम करावे लागतात तसेच अितरांना बौद्धिक श्रमहि करावे लागतात. बौद्धिक-श्रमाचे शरीर-श्रमाअितकेच किंवा त्यापेक्षां देखील अधिक महत्व आहे. पण आपण जर अधिक खोल विचार केला तर समाजधारणेच्या दृष्टीने स्थिति काही वेगळीच आहे असे आपल्यास आढळून येअील. समजा श्रमजीवि लोकानी आपआपले धदे अेकाअेकी सोडून दिले तर काय परिणाम होअील ? माणसाच्या प्राथमिक गरजेच्या वस्तु देखील तयार होणार नाहीत. म्हणजेंच समाज जिवत राहूं शकणार नाही. अुलट बुद्धिजीवि लोकांनी जरी आपले धदे सोडलें तरी समाजांत थोडी अव्यवस्था अवश्य होअील, पण समाज मरणार नाही. बुद्धिजीविलोकाचे जीवन देखील श्रम-जीवियाच्या धंद्यावर अवलबून आहे. यावरून समाजाच्या अस्तित्वासाठी श्रमजीवियाची किती गरज आहे हें सहज ध्यानांत येअील. पण दैव-दुर्विलास असा की, श्रमजीवियांची मजूरी किंवा मिळकत कमी असून त्यांची समाजांत मुळीच प्रतिष्ठा नाही आणि त्याचें जीवन अत्यंत कष्टमय आहे. मुलांचे शिक्षण, आजारी पडला तर औषध, किंवा मनोरंजन आदि तर त्याला मिळतच नाहीत.

या अुलट बुद्धिजीवियांचे वेतन किंवा नफा अधिक असून त्याना समाजांत भरपूर प्रतिष्ठा आणि अितर सुखसोयी मिळत आहेत. ह्या व्यवस्थेंत समाजाला काही दोष आहे असें वाटतच नाही. कायदा सुद्धां ह्याच स्थितीचे समर्थन करतो. तरीहि हें न्यायोचित आहे काय ? असा प्रश्न राहतोच. आता आपण मूलप्रश्नाचा विचार करू.

## बुद्धिजीवियाना अधिक धन कमाविण्याचा अधिकार आहे काय ?

धन-सचय आणि अधिक धन कमविण्याच्या पक्षाचें लोक आपले समर्थन करीत असतात. त्याचाहि विचार केला पाहिजे. देशातील आणि परदेशातील अुत्तम विद्यालयातून पुष्कळ दिवस शिक्षण घेतल्यानतर विशेषज्ञ बनलेले लोक, जसें डॉक्टर, आपला धंदा करायला लागतो. धदा चागला चालतो. कारण चागला धदा चालण्या अितपत योग्यता त्याच्याजवळ आहे. म्हणून तो स्वतःला, आपल्या योग्यतेद्वारा अधिकात अधिक धन कमाविण्याचा अधिकारी आहे असें मानतो. त्याचा हा अधिकार समाज सुद्धां मान्य करतो. तो आपल्या मनास येअील तितकी फी आकारतो आणि जर कोणी त्याला कमी फी घेण्याचा आग्रह करील तर 'अनेक वर्षे कठोर परिश्रम आणि पैसा खर्च करून योग्यता संपादन केल्यामुळें मला त्याच प्रमाणात मोबदला मिळाला पाहिजे' असे तो बजावून सागतो. रोगी गरीब असला तर कधीं कधी त्याला सूट मिळेल; पण सूट मिळण्याचा त्या गरिबाला अधिकार नसतो. कायदे-पण्डित आणि कुशल अिंजिनीयर, अुत्तम लेखक, कवि, चित्रकार आदि कला-कोविदाची अशीच अवस्था आहे. आणि व्यापारी, कारखानदार, व्यवस्थापक आदिहि असलाच अधिकार जताकून सागतात.

स्वस्तांत स्वस्त दरात खरेदी आणि महागात महाग विक्री असा व्यापारी आणि कारखानदारासाठी अर्थशास्त्राचा नियम आहे. नफ्याला तर काही मर्यादाच नाही. मजुराच्या शरीर-श्रमाशिवाय जो कारखाना

चालूंच शकत नाही त्या मजूरांना महिन्याला शे-पन्नास रुपयापेक्षा अधिक न मिळतां व्यवस्थापकांना आणि भाडवलवाल्याना हजारों किंवा लाखो रुपये मिळाले तरी ते आक्षेपार्ह मानलें जात नाही. बुद्धिमानाना अमर्याद धन मिळविण्याचा आणि सपत्ति आपल्याजवळ अेकत्रित करण्याचा अधिकार आहे. कारण त्यानी कष्ट करून तितके धन मिळविण्याची शक्ति आणि कला प्राप्त करून घेतली आहे. ज्याच्याजवळ तशी शक्ति आणि कला नाहीं त्यांना अधिक पैसा मिळत नाही किंवा त्याना अुपाशी मरावे लागते तर त्यासाठीं अितराना दोष कां द्यायचा ? पण त्या गरिबानाहि बुद्धि आहे आणि संधि मिळाली असती तर त्यानाहि बुद्धिजीवियासारखी शक्ति प्राप्त करून घेता आली असती अिकडे आमचे लक्षच जात नाही. पण ही गोष्ट जाअू द्या. आपल्याला या शक्तिसंपन्न लोकांचा अमर्याद धन मिळविण्याचा अधिकार मानावा की नाही याचे परीक्षण करायचे आहे. समजा अेखाद्या रुहान मुलाला अगदी बाळपणीच अेकांतात सोडून दिले. त्याचा जनतेशीं संपर्क येअू न देता त्याच्या रक्षणाची आणि पोषणाची व्यवस्था करून त्याला तसेंच वाढू दिलें तर परिणाम काय होअील ? त्याला बोली सुद्धां शिकतां येणार नाही. आपल्या मनातील गोष्ट अितराना समजावून सागता येणार नाही व अितरांची बोली त्याला समजणार नाही. साधा व्यवहार देखील त्याला करता येणार नाही. समाजात राहण्यानेच म्हणजेच समाजाच्या कृपेनें मनुष्य व्यवहार-कुशल बनतो. मूल, प्राथमिक शाळेपासून देशी परदेशी अुच्चतम महाविद्यालयात शिकून योग्यता संपादन करतें. ही सगळी शिक्षालयें त्याची स्वत:ची नसतात. ती अेकतर सरकारी खर्चांतून चालतात, म्हणजेच जनतेकडून करांच्या रूपानें वसूल केलेल्या रकमेतून चालतात, आणि कांही संस्था दानशूर लोकांच्या कृपेने चालतात. शिक्षणाची जी कांही फी दिली जातें ती खर्चाच्या तुलनेत अगदीच अल्प असतें. विद्यार्जनासाठी जो पैसा खर्च केला जातो तो देखील त्याला किंवा त्याच्या कुटुंबियांना वर लिहिल्याप्रमाणें

समाजाकडूनच मिळाला आहे. ह्या पैशाच्या बळावर विद्या संपादन करून ज्याला योग्यता मिळाली आहे त्याला तर समाजाविषयी अधिक कृतज्ञ असलें पाहिजे.

हजारो वर्षे कष्ट करून अनेक ऋषींनी कणकण करून जो ज्ञान संग्रह केला त्याच्याच बळावर या शिक्षणांतून थोडेसे ज्ञान मिळतें. व्यापारी आणि कारखानदार आपली कला विद्यालयातून आणि आपल्या मित्रांजवळून प्राप्त करतो माणूस अभ्यास करतो व स्वतःच्या बुद्धीचा अुपयोग करतो. पण योग्यता संपादनकरण्यासाठी त्याचा स्वतःचा भाग अितका कमी आहे की वर लिहिल्यानुसार सामाजिक मदत मिळाली नाही तर काही विशेष करण्यालायक तो बनू शकत नाही. म्हणून योग्यता संपादन करण्यात स्वतःच्या कष्टाचा भाग अल्पतम असून सामाजिक कृपेचा अंश अधिकतम आहे. म्हणूनच आमच्या योग्यतेचा अुपयोग समाजासाठी करून त्याच्या मोबदल्यात समाजाकडून कमीत कमी घेणे न्याय्य आहे आणि तेच आमचें कर्तव्य आहे असें मानलें पाहिजे. पण त्याच्या अगदी अुलट चालले आहे. समाजाकडून अधिकांत अधिक घेअून, समाजाला कमीत कमी देण्याची माणसाची अिच्छा आहे. आणि समाजाला काहीच न देण्याचा प्रसंग आला तर त्याला दुःख होत नाही. अखेर माणसाची पैसा मिळविण्याची शक्ति देखील केवळ त्याच्या अिच्छेवर नसून सामाजिक आणि आर्थिक व्यवस्थेवर अवलंबून आहे. जर आर्थिक समानतेचा काळ आला असला, हा काळ कधीना कधी येणारच आहे; तर आज आम्ही ज्या धन मिळविण्याच्या शक्तीचा अभिमान बाळगतो तिचा पैशाच्या रूपांत काय अुपयोग होअील ?

## बुद्धीचा अुपयोग आजीविकेसाठीहि करणें अुचित आहे काय ?

बुद्धीचा अुपयोग पैसे मिळविण्यासाठी करणें अुचित आहे काय ? हा अत्यंत गंभीर आणि मूलभूत प्रश्न आहे. बुद्धीच्या असल्या अुपयोगानेच भयंकर आर्थिक विषमता वाढत आहे हे अुघड आहे. साधारणपणें शोषण देखील

तिच्याच बळावर होतें. समाजांत आर्थिक आणि सामाजिक विषमता आहे. त्यामुळे शोषण होऊन समाजांत अशांति निर्माण होत आहे. ही अशांति दूर करण्यासाठीं जगांत आतापर्यंत अनेक योजना झाल्या आणि त्यापैकीं कांही अंमलांतहि येत आहेत. पण अहिंसेने हा यक्ष-प्रश्न सोडवावयाचा असल्यास गांधीजीच्या खालील सूत्रानुसार चालावे लागेल; "पोट भरण्यासाठी हाता-पायांचा, आणि ज्ञान-प्राप्ति आणि ज्ञान-दानासाठीं बुद्धीचा अुपयोग करावा. अशी व्यवस्था असली पाहिजे की जीत प्रत्येकाला चार तास शरीर-श्रम करावे लागतील आणि चार तास बौद्धिक-श्रम करण्याची संधी मिळेल. शिवाय चार तासांच्या परिश्रमाने निर्वाह चालण्याअितकें धन त्याला मिळालें पाहिजे."

सध्यां समाजात अधिक लोक आपला निर्वाह शरीर-श्रमावर करतात. आणि थोडे लोक बौद्धिक श्रमावर जीविका चालवितात. ज्यांच्याजवळ संपत्ति अधिक आहे ते सुखांत राहतात. त्यातील अनेकाना श्रम करण्याची संवय सुद्धां नाहीं. अशा स्थितीत गांधीजीचें सूत्र अमलात येणें अशक्य आहे. तरी त्याच्या मागे जे तथ्य आहे तें आपण स्वीकारलें पाहिजे. आपल्या दुर्बल-तेमुळें कदाचित् आपण हा विचार पूर्णपणें अंमलात आणू शकणार नाही, ही गोष्ट वेगळी. कारण जगण्यासाठी लागणारी साधन-सामुग्री कुणाच्यातरी श्रमा-शिवाय तयारच होअू शकत नाही. म्हणून शरीर-श्रम केल्याशिवाय त्या वस्तूचा अुपभोग घेण्याचा न्यायोचित अधिकार आपणांस मिळत नाही. पैशाच्या बळावर आपण त्या वस्तू विकत घेअू शकतो; पण पैसा देखील श्रमाशिवाय निर्माण होअू शकत नाही. याशिवाय बुद्धीचा अुपयोग समाजहित सोडून स्वतःच्या स्वार्थासाठी केला जातो तेव्हां अितरांचे नुकसान होतें. मग हा स्वार्थ व्यक्तिगत, जातीचा किंवा समूह अगर देशाचा असला तरी त्यापासून होणारी अितराची हानि टळत नाही. अणुबॉंब बुद्धीच्या असल्याच अुपयोगांतून निर्माण झाला आहे.

जसें शरीर-श्रमाचें मूल्य मानतों तसें बौद्धिक श्रमाचेंहि मूल्य मानलें पाहिजे असें पुष्कळ लोक म्हणतात. यांतहि आपल्याला हातपाय हालवावे लागत नसले तरी श्रम तर करावेच लागतात; बौद्धिक काम करणारांना त्याच बरोबर शरीर श्रम करून आपला निर्वाह चालविण्याअितका वेळ मिळत नाही, शरीर श्रम करण्यातहि बुद्धीचा अुपयोग केला तर अधिक यश मिळते, काही कामेंच अशी आहेत की तीं विद्वानांशिवाय चालूंच शकत नाहीत. अलबत जोपर्यंत आजची स्थिति कायम राहील, म्हणजेच तिच्यांत आमूलाग्र बदल होणार नाही तोपर्यंत या तर्काला महत्व द्यावें लागेल. परतु आपल्याला मूलभूत सिद्धांताचा विचार करावयाचा आहे. व्यावहारिक दृष्टीनें त्याबाबत थोडीशी अुणीव सहन करावी लागेल. तरी आज बुद्धिजीवियाच्या आणि श्रमजीवियाच्या मिळकतीत जितका फरक आहे तितका फरक कां असावा ? असा प्रश्न राहतोच. जर बुद्धिजीवियांच्या सवयी आणि राहिणीमुळें अधिक मिळकतीशिवाय त्यांचें निभूंच शकत नाही असें म्हटलें तर त्यांना अशा सवयी कां लागल्या ? त्याना आता त्या सवयीना मुरड घालतां येणार नाही काय ? त्या सवयी दुरुस्त करण्याचा आम्ही आटोकाट प्रयत्न कां करूं नये ? जोपर्यंत अशा अडचणी आहेत तोपर्यंत कुटुंबांतील अशक्त माणसाला जशा अधिक सुखसोयी मिळतात तशाच त्यानाहि कदाचित् मिळतील. पण त्याने आजच्या विषमतेचें समर्थन कसें होअू शकेल ?

## श्रीमंतांनी विश्वस्त (ट्रस्टी) बनावें.

"आम्ही आमच्या संपत्तीचा फार थोडा भाग स्वतःच्या व्यक्तिगत अुपयोगासाठी वापरतों असेहि काही लोक म्हणतील. त्यांतला संपत्तीचा मोठा हिस्सा भांडवलाच्या रूपाने चालणाऱ्या आणि समाजोपयोगी वस्तु बनविणाऱ्या मोठमोठ्या अुद्योगधंद्यांत आम्हीं गुंतवतो. आमच्या प्रयत्नानें अनेक लोकांना काम मिळतें आणि त्यांचा निर्वाह चालतो. अेक प्रकारें आम्ही समाजाची सेवाच करीत असतों. पण व्यक्तीच्याजवळ संपत्ति अेकत्रित

झाली नसती तर हें सगळें कसें होअू शकलें असतें ? सर्व सामाजिक व्यवहार बंद पडले असते." गरिबांचा निर्वाह चालविण्याचीं जी गोष्ट बोलली जाते तिचें तर अेवढेच अुत्तर पुरेसे आहे की; या गरिबाच्या श्रमाशिवाय या श्रीमंतांचें कारखाने आणि अितर व्यवहार चालूच शकत नाहीत. म्हणून ज्यांच्या परिश्रमानें त्यांना नफा मिळतो, त्या गरिबांचेच श्रीमंतावर अुपकार आहेत असें म्हणणे योग्य होअील. जर असली कामें राज्यसत्ता किंवा सहकार-समित्यांद्वारा चालविणें शक्य नसते तर वरील कथनात कांही तथ्यांश आहे असें मानले असते. त्याच्या तपशीलांत आपणांस शिरायचें नाही. येथे आपल्याला श्रीमंताच्या दृष्टीनें विचार करावयाचा आहे. आमच्या बहुतेक प्रयत्नामुळें समाजाचें सुख वाढते असें जे श्रीमंत म्हणतात त्यांना आपले प्रयास स्वार्थासाठी आहेत कीं, समाज-हितासाठी आहेत असा सरळ प्रश्न मी विचारतो. हेतु तर स्वार्थाचाच आहे, पण त्यातून अितरांचा कांही लाभ झालाच तर तें त्याचे भाग्य असे याचे खरेखुरे अुत्तर आहे. जर आमचा हेतु देशहिताचा आहे असें अुत्तर आले तर आनंदच आहे; पण मग आपली सगळी कामें देशहितार्थ सचोटीनें करा अितकाच आमचा आग्रह राहील. श्रीमंतांनी आपल्या अधिक संपत्तीचा अुपयोग समाजहितासाठी अेक विश्वस्त म्हणून करावा असेच महात्मा गांधी म्हणत असत. संपत्ति-दान-यज्ञ आणि भू-दान-यज्ञाचा तरी अंतिम अुद्देश काय आहे ? आपल्याजवळ गरजेपेक्षा अधिक जे कांही आहे त्यावर आपला अधिकार नाही असें समजून त्याचा अुपयोग अितरांसाठी करावा असाच भूमि-दान आणि संपत्ति-दान-यज्ञाचा अर्थ नाहीं काय ?

## सदोष दान

श्रीमंताच्या दानानें दवाखाने, विद्यालयासारखी समाजाच्या अुपयोगाची अनेक मोठमोठी कामें होतात. जर व्यक्तीजवळ संपत्ति अेकत्रित झाली नाही तर समाजाला हा लाभ कसा मिळेल ? असें कांही लोक म्हणतात. खरोखर असली कामें करण्यासाठी राज्यसत्ता—सरकार—आहेच. जेव्हां संपत्ति थोड्याशा

हातांत न साचता समाजात पसरेल तेव्हां सहकारी पद्धतीने मोठ्या प्रमाणावर असली कामे सहज चालवितां येतील आणि त्यापासून लाभ घेणारे याचक किंवा दीन न बनतां सन्मानपूर्वक त्याचा अुपयोग करून घेतील. श्रीमंतांच्या दृष्टीने विचार केला तरी कोटयावधि रुपयांची संपत्ति अेकत्रित केल्यानतर त्यातून कांही लाख रुपयांचें दान केल्याने दुसऱ्याच्या हिश्शाची वस्तु आपल्या जवळ सांठवून ठेवण्याच्या दोषातून तें मुक्त होअूं शकत नाहीत. न्याय्य अन्याय्यतेचा विचार न करतां पुष्कळ धन मिळविल्यानतर त्यांतल्या थोड्या भागाचे दान करण्याने पूर्ण प्रायश्चित्त होअू शकत नाही. तसेच सर्व श्रीमंताची दानाची रीत पाहिली तर त्यांत शुद्ध दान कोणतें आहे ह्याचा तपास करणें कठिण आहे जिकडे पहावे तिकडे स्वार्थ किंवा प्रसिद्धीची दृष्टि अधिक दिसून येते. कधी कधी दानाचा सौदा व्यापारी सौद्यापेक्षां देखील अधिक कठोर असतो. अेक लाखाचे दान करून दहा लाखाची कीर्ति मिळविण्याची अिच्छा असते. शुद्ध सात्विक दान तर क्वचितच होत असते.

## दैववाद

अितर देशात आणि धर्मांत नसलेली प्रारब्धवाद नावाची अेक विशेष गोष्ट हिन्दुस्थानात चालत आलेली आहे. पूर्वजन्मात जें पुण्य केलें त्याचें फळ म्हणून या जन्मात संपत्ति आणि सुख मिळतें असें मानलें जाते. ज्यांनी पाप केले आहे त्याना गरीबी आणि कष्टात जीवन घालवावें लागतें. अशा स्थितीत कुणी कुणाला दोष का द्यावा ? असल्या प्रकारच्या चर्चा तर चालतच असतात. पण दैववादावर आमची पूर्ण श्रद्धा आहे काय ? खरोखर श्रद्धा असेल तर खेदाचें मुळींच कारण नाही. पूर्वजन्माचा या जन्माशी संबंध येत असला तर या जन्माचा पुढल्या जन्माशी निःसंशय आलाच पाहिजे. या जन्मात आपल्या भाग्यानें जें मिळायचें तें मिळालें पण पुढच्या जन्माची व्यवस्था करून ठेवणें तर आपल्याच हाती आहे. पुढल्या जन्मांत जर सुख समृद्धि मिळणार असली तर या जन्मात आपल्याला पुण्यच पुण्य करायला

पाहिजे. जर ही गोष्ट अधिक व्यापक बनली तर आणखी काय पाहिजे? समाजांत सुखशांति दृढमूल होओील. पण भाग्याच्या भरंवशावर कुणी बसला आहे असें वाटत नाही. प्रत्येक जण जीवापाड श्रम करुन सांसारिक कटकटी वाढवीत आहे. बहुतेकांना संपत्ति संपादन करताना पापपुण्याची आठवण देखील राहत नाही. लांच-लुचपत मोठ्या प्रमाणावर वाढत असल्याची तक्रार रात्रंदिवस चालू आहे ती काय सुचविते? हा भ्रष्टाचार किंवा पाप गरीबच करतात, श्रीमत करीत नाहीत असें मानणे बरोबर नाही. वास्तविक श्रीमतांचे पाप कमी नाही. जेव्हा श्रीमत लोक देखील पैसा कमावितांना पाप करण्यास कचरत नाहीत तेव्हां त्यांचा हा दैववाद खरोखर मनःपूर्वक आहे असें आम्ही कसें मानावे? आणि जर हा दैववाद चालावयाचाच असला तर गरीब लोक देखील, आमचे भाग्य पालटलें आहे आणि श्रीमंतांची सपत्ति लुटून आमचा भाग्योदय करण्यास हरकत नाही असें आमचे दैव सुचवीत आहे असें म्हणतील. म्हणून दैववाद ही दुधारी तलवार आहे. शिवाय श्रीमंतांपेक्षां गरिबांची संख्या पुष्कळच जास्त असल्याने श्रीमतांना तिच्यापासून अधिक धोका आहे. गरिबांना त्यांच्या भाग्याच्या भरंवशावर सोडणें भयानक आहे. कारण त्यांची दीर्घकाल अवहेलना झाली आहे. म्हणून आतां लक्ष्मीनारायणाअैवजी दरिद्रीनारायणाचीच अुपासना केली पाहिजे.

## स्वार्थाचें स्थान?

व्यक्तिगत स्वार्थाला स्थान दिल्याशिवाय देशातील अुत्पादन आणि संपत्ति वाढूं शकत नाही व बचत देखील होअू शकत नाही, असे अर्थशास्त्रज्ञ म्हणतात. क्षणभर माणसांत स्वार्थवृत्ति स्वभावतःच आहे असें मानलें! पण श्रीमंत तर स्वतःच हा मुद्दा अुपस्थित करीत असतील तर त्याचें अुत्तर असें की, सामाजिक आणि वैयक्तिक स्वार्थांत विरोध असेल त्यावेळीं वैयक्तिक स्वार्थाला महत्व देतां येत नाही. अर्थशास्त्रज्ञ विपुल भांडवलाचा संग्रह अनिवार्य मानतात. पण सर्वोदय समाजात भांडवलापेक्षां

माणसाचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे. विकेंद्रित अुत्पादन आणि क्षेत्रस्वावलंबनांत मनुष्य-शक्तीचे व शरीर-श्रमाचें अधिक महत्व आहे. त्यासाठी थोडेसे भांडवल पुरेसे होतें. काही वस्तूसाठी मोठे कारखाने चालवावे लागलें तर ते सहकारी व्यवस्थेखाली चालवितां येतात. अुद्योगधंद्याची सरकारी मालकी व व्यवस्था आज शक्य नसली तरी तशी स्थिति निर्माण केल्याशिवाय देशाचें कल्याण होअू शकत नाही. भांडवलशाही गरीबी किंवा बेकारीचा प्रश्न सोडवूं शकली नाही असा आजपर्यंतचा अनुभव आहे. शिवाय स्वार्थवृत्तीचे पोषण करणें नैतिकतेच्या दृष्टीने देखील अयोग्य आहे. साधारणपणे स्वार्थ म्हणजे परार्थीची हानि असे समीकरण आहे. त्यांतूनच स्पर्धा निर्माण होतें व थोडेसे लोक त्यापासून आपला फायदा करून घेअु शकतात. पण बहुसंख्य लोकांचे नुकसान होते. त्यामुळें मानवोचित सहकार्याअैवजी जगली कायदा किंवा 'मत्स्यन्याय' सुरू होतो. अखेर समाज-हित कोणत्या वृत्तीनें होअील, हे आपणास पहावयाचे आहे. समाजात स्वार्थान्ध लोकांची संख्या अधिक असली तर सामाजिक-कल्याणाची आशा बाळगता येअील काय ? परोपकार-वृत्तीच्या बळावरच समाजाची पातळी अुचावू शकतें. म्हणून संपत्ति वाढविण्यासाठी स्वार्थाचा आधार घेणे दोषास्पद आहे.

## आणि दात्याला दीन बनावे लागले तर ?

अर्थनीतीच्या बाबतीत कांही लोक अमेरिकेचें अुदाहरण देत असतात. हिंदुस्थान हे Welfare State–कल्याणकारी राज्य–बनविण्याचे प्रयत्न चालू आहेत. सर्व प्रकारच्या दुर्बलांना सरकारकडून मदत मिळावी असा कल्याणकारी राज्याचा अर्थ आहे असे मानलें जातें. म्हणजेच मोठ्या प्रमाणावर कर वसूल करून त्यांतून गरिबांना मदत करायची असते. भारतासारख्या दरिद्रि देशात हें घडून येणे शक्य आहे काय ? आरोग्य आणि शिक्षणाच्या बाबतीत राज्याची कल्याणकारी प्रणाळी असावी हे समजू शकतें; पण आर्थिक बाबतीत म्हणजेच पोट भरण्यासाठी प्रजेने

सरकारच्या भरंवशावर रहावें हें कितपत योग्य आहे ? प्राथमिक गरजांच्या बाबतीत माणूस स्वावलंबी झाल्याशिवाय तो स्वतंत्र राहूंच शकत नाहीं. कोणत्या ना कोणत्या स्वरूपात त्याला पराधीन राहावे लागेल. अमेरिके-सारख्या संपन्न देशाचें अुदाहरण आमच्या कामी पडू शकत नाही. कारण तिथे साऱ्या जगांतील संपत्ति नेअून साठलेली आहे आणि म्हणून गरिबांना देखील तिथें पुष्कळ सुख मिळत आहे. त्यामुळे आपल्या आजच्या स्थितीत किंवा नजीकच्या भविष्यकाळांत हे अुदाहरण आमच्या काय कामाचे ? आपल्या देशांत दरवर्षी कुठे ना कुठे करोडो लोकाना दुष्काळसदृश परिस्थितीतून जावें लागतें. धान्याची कोठारें भरली असली तरीपण काही प्रांतातील बऱ्याच लोकांना अर्धपोटी किंवा अुपाशी राहावे लागत आहे. कारण धान्य विकत घ्यायला गरिबांजवळ पैसा नसतो. पण कामच मिळत नाही आणि म्हणून पैसा मिळत नाही. श्रीमतांच्या केंद्रित अुद्योग धंद्यांमुळें बेकार लोकाना ग्रामोद्योग मिळूं शकत नाहीत. तरी कल्याणकारी राज्य असल्याने सरकार आणि दानशूर लोक पीडित लोकांना मदत करण्यासाठीं काही व्यवस्था करीत आहेत. पण ती पुरेशी आहे काय ? काही लोक भुकेलेल्याना तांदुळाची पेंज वाटीत आहेत; आणि कांही घेत आहेत; कांही दयाळू कपडा वाटीत आहेत; आणि काही अर्धनग्न कपडा घेत आहेत असे दृश्य तर काही वेळ नजरेसमोर आणा ! असली चित्रें वर्तमानपत्रांतून येतहि असतात. पण ही दृश्यें माणसांचें हृदय व्यथित करणारी नाहीत काय ? अेक माणूस वस्तु वाटण्याच्या अवस्थेत असावा आणि दुसरा ती घेण्याजोग्या विपन्नावस्थेत ! यातलें मर्म वाटणाराच्या तेव्हांच ध्यानांत येअू शकेल कीं, जेंव्हा त्यांना मागण्यासाठी दीनतेने हात पसरावा लागेल. स्वराज्य मिळाल्यानतरहि हे कुठपर्यंत चालणार ? प्रत्येकाला त्याच्या गरजेनुसार अन्न, वस्त्र, आणि घर मिळाल्यानतर जर कांही अुरेल तरच श्रीमतांनी ते आपल्याजवळ ठेवावे. तेहि वस्तुतः आक्षेपार्हच. कारण जोपर्यंत गरिबांचे भरण-पोषण नीट होत नाही तोपर्यंत श्रीमंतांना बेचैन

वाटलें पाहिजे. महालात राहणारांनी आपल्या भव्य बगल्या समोरच्याच पायरस्त्यावर घरदार नसणाराना आपले जीवन कां व्यतीत करावे लागतें याचा विचार केला पाहिजे. मोटारीत बसून मौजेने फिरणारांनी त्याच सडकेवरून साठसत्तर वर्षे वयाच्या स्त्री-पुरुषाना गवताचा भारा किंवा लाकडाची मोळी डोक्यावर घेऊन अनेक मैल का चालावें लागते याचा विचार केला पाहिजे असल्या बाबींचा विचार करीत राहिला तर आपल्याजवळ अधिक संपत्ति ठेवण्याचा अधिकार आहे की नाही या प्रश्नावर बराच प्रकाश पडेल

## देशालाच कुटुंब समजू या.

समजा अेका कुटुंबात ५ माणसें आहेत. त्यांना चार शेर धान्याची गरज आहे. जर चार शेर धान्य मिळाले तर सगळे पोटभर जेवतील पण तीनच शेर मिळाले तर काय करतील ? पांचांतील दोघांना अुपाशी ठवून बाकीचें पोटभर खातील का ? कुटुंबांत असे होत नसते. जर गरजेपेक्षां कमी मिळालें तर सगळेच थोडे थोडे कमी खाअून निभाअून घेतात. त्यातहि लहान मूल व आजारी माणसाची प्रथम व्यवस्था करतात. सामाजिक दृष्टीनें हाच न्याय समाजांतील सर्व व्यक्तींना लागू झाला पाहिजे. राज्यकर्त्यांच्या आणि समाजाच्या दृष्टीने सगळा देश म्हणजे अेक कुटुंब आहे. देशात पुरेशी संपत्ति असेल तर सर्वांनी तिचा पूर्ण अुपभोग घ्यावा. पण संपत्ति अपुरी असेल त्यावेळी प्रत्येकाची कांहीना कांही कष्ट सहन करण्याची आणि त्याग करण्याची तयारी असली पाहिजे. धर्माची देखील अशीच शिकवण आहे. आपला परका असले भेद चुकीचे आहेत, सार्‍यात अेकच आत्मा आहे, अीश्वराने सगळ्यांना निर्माण केले आहे, आम्ही सगळे भाअू बहिणी आहोत, असले तत्वज्ञानाचे विचार वेळी अवेळी आपल्या जिभेवर खेळत असतात. म्हणून या योग्य विचारांचा आणि दैनंदिन आचरणाचा मेळ बसविण्याचा आपण सतत प्रयत्न केला पाहिजे.

## शरीर-श्रमाचा तिटकारा

शरीर श्रमाविषयीं आजच्या सामाजिक विचारप्रणालींत अेक मोठा दोष आहे. असा दोष कदाचित् अितर देशांत तुम्हाला आढळणार नाही. आमची शरीर-श्रम करण्याची अिच्छा नसते; अेवढेच नव्हे तर शरीर-श्रम करणें आम्ही तुच्छ समजतो. ज्याना शरीर-श्रम करावे लागतात त्याना समाजांत अगदी कनिष्ठ दर्जाचे मानतो. श्रीमंत किंवा गरीब कुणीच श्रम करूं अिच्छित नाही. श्रीमंत आपल्या पैशांच्या बळावर नोकरांकडून कामें करवून घेतात, आणि गरीब भूक भागविण्यासाठी लाचारीने श्रम करतात. आम्हाला ही वृत्ति बदलली पाहिजे. शरीर-श्रमाची नुसती प्रतिष्ठा स्थापित करून समाधान मानून भागणार नाही. त्याविषयी आमच्या हृदयांत प्रेम असले पाहिजे. श्रीमंत आणि मध्यम वर्गातील लोकांनी स्वतःच्या आचरणाने शरीर-श्रमाचे अुदाहरण लोकाना घालून दिलें पाहिजे.

### आर्थिक विषमता नष्ट केल्याशिवाय चालणार नाही.

शरीर-श्रमाशिवाय संपत्ति बनत नाही. अर्थात् श्रीमंताजवळ अेकत्रित होणारी संपत्ति म्हणजेच गरिबांच्या शरीर-श्रमाचे फळ होय हें या आधीच सांगितले आहे. शिवाय गरिबांच्या सहकार्याशिवाय श्रीमंत लोक संपत्ति कमावू शकत नाहीत, आपल्याजवळ ठेवू शकत नाहीत व तिचा अुपभोगहि घेअू शकत नाहीत. स्वतःसाठी गरजेपेक्षां अधिक संपत्ति ठेवण्याचा आणि कमाविण्याचा कुणा अेका व्यक्तीला अधिकार नाहीं हा निर्णय न्याय्य दृष्टीने पाहता मान्य करावा लागतो. कुणाची गरज किती मानायची ? असा प्रश्न अुद्भवूं शकतो. माणसा-माणसांत या बाबतीत फारसा फरक असू नये. रोगी आणि निरोगी, मूल आणि तरुण व याशिवाय प्रत्येकाच्या वेगवेगळ्या सवयीमुळें थोडासा फरक पडू शकतो व तसा फरक आपण मान्यहि केला पाहिजे. न्यायाच्या दृष्टीने गरजांच्या बाबतीत निर्णय करणें कठिण नाही. परंतु जेव्हां वैयक्तिक स्वार्थ, सांसारिक मोह, पैशाचा लोभ आदि दोषांचे तांडव सुरू होतें, तेव्हां

## गरिबांकडूनहि दान कां मागतां ?

भू-दान यज्ञांत मोठमोठ्या जमीनदाराकडून पुष्कळशी जमीन मिळविण्याची आशा राखलेली आहे आणि त्याच बरोबर थोडी जमीन असणाऱ्यांकडूनहि कांहींना कांहीं जमीन मागितली जात आहे. तुलनात्मक दृष्टीने पाहिल्यास थोडी जमीन असणारांचेंचे औदार्य मुख्यतया प्रकट झाले आहे असा अनुभव आहे. भू-दानाप्रमाणेंच संपत्ति-दान-यज्ञांतहि गरीब-श्रीमंत आदि सगळयांनी आपआपल्या शक्तीनुसार आपल्या अुत्पन्नाचा काही भाग द्यावा अशी अपेक्षा आहे. ज्याच्याजवळ ५–७ अेकरांपेक्षां अधिक जमीन नाही त्याच्या जवळूनहि जमीन का मागितली जाते ? तसेंच अुत्पन्न अगदी कमी असल्यानें ज्यांचा गरीबीचा संसार देखील नीट चालत नाही आणि प्रत्यही थोडेसे तरी अुत्पन्न कसे वाढेल अशी विवंचना ज्याना असते अशा निर्धन लोकाकडूनहि संपत्ति-दान यज्ञासाठी काहीना काहीं मिळण्याची अपेक्षा कां ठेविली जाते ? असेहि लोक विचारतात दान देण्यासाठी कुणावर जबरदस्ती तर केली जात नाही. देणे प्रत्येकाच्या अिच्छेवर अवलंबून आहे. दाता जर प्रसन्न चित्तानें दान देत असेल तर तें दान कां घेअूं नये ? यज्ञांत आपला हविर्भाग टाकण्यासाठी श्रीमत-गरीब आदि सगळयांना निमंत्रण आहे. पुष्कळदा गरिबांनी दान देण्याचा प्रवाह चालू केला की, श्रीमतहि दान देण्यास सुरवात करतात. वास्तविक असल्या विश्व-यज्ञांत साऱ्यांचें सहकार्य आवश्यक आहे. या बाबतीत श्रीमतानी जनतेचे नेतृत्व केलें पाहिजे. पण त्याना अधिक जमीन आणि अधिक संपत्ति द्यावी लागेल. जास्त संपत्ति आणि जमिनीचा लोभही थोडा जास्तच राहणार, आणि म्हणून आपल्या मनाचा निर्णय करण्यास श्रीमंतांना अधिक वेळ लागतो. म्हणूनच गरीब श्रीमंत आदि सर्वांनी अुत्साहपूर्वक दान देण्यास तयार असले पाहिजे. समाजांत स्वार्थबुद्धि वाढून जो भ्रष्टाचार चालूं आहे त्यालाहि थोडासा पायबंद लागावा म्हणून या यज्ञांत भाग घेणारा आपल्या हृदयांतील शुद्धाशुद्धतेचा विचार अवश्य करील. स्वार्थ-

वृत्तीने कोणाला सोडले आहे ? ती गरीब श्रीमंत आदि सगळयांतच आहे; म्हणून साऱ्याचे मन सुधारण्याची आवश्यकता आहे. स्वार्थवृत्ति कमी झाल्याशिवाय समाजाची अुन्नति होणार नाही. लोक दान करतील तर राष्ट्रीय जीवन शुद्ध होअील. लहानमोठ्या सगळ्यांचा अेकमेकावर परिणाम होत असतो. दुर्गुणांप्रमाणें सद्गुण सुद्धां माणूस अितराचे पाहून शिकतो. म्हणून सर्वांनी आर्थिक समता, शरीर-श्रम आणि स्वावलंबनाचे महत्व समजून घ्यावें, प्रत्येकानें दुसऱ्याच्या सुखदुःखाची चिंता ठेवावी, अैक्य भावना वाढावी, सगळ्यांचा स्वार्थ कमी व्हावा अित्यादि गुणाच्या विकासासाठीं, गरीब श्रीमंत सर्वांनी आपआपल्या शक्तिनुसार या यज्ञांत भाग घेणें अत्यंत आवश्यक आहे.

## धन-लालसा कमी झाली पाहिजे.

वस्तुतः गरिबाना मदत मिळाली पाहिजे. हे यज्ञ त्यांना मदत करण्यासाठीच आहेत. तरीहि त्यांच्याकडून थोडेसे का होअीना पण कांहीना काही मागितलें जात आहे. कारण त्याची धन-लालसा देखील कमी होणें आवश्यक आहे. आज गरिबाना देखील आमच्या आर्थिक व्यवस्थेचा मूलदोष माहीत नाही. म्हणून श्रीमंत होण्याची संधि मिळाली तर ती त्याना हवीच आहे. श्रीमंत, गरीब अगर मध्यम वर्गांतील साऱ्या लोकाना अधिकाधिक श्रीमंत बनण्याची लालसा सतावीत आहे. जे श्रीमंत नाहीत पण श्रीमंतांना दोष देतात ते देखील श्रीमंत होण्याची लालसा बाळगतात सर्वत्र धनासाठी धांवपळ चाललेली आहे. कारखान्यांतील मालक आणि मजुराचे सारखे भांडण सुरूच आहे. गरिबाची आणि मजुराची स्थिति सुधारणें आणि त्याचे अुत्पन्न वाढविणें तर अत्यंत आवश्यक आहे पण आपली सुधारणा करून घेण्यापेक्षा अधिक पैसा मिळविण्याकडे त्याचे अधिक लक्ष आहे. देशात आपल्यापेक्षां अधिक गरीब लोक आहेत आणि या मोठ्या कारखान्यांमुळें अितर लोकाचे दारिद्र्य वाढत आहे तिकडे त्याचें लक्ष नाही. मालकाप्रमाणे मजूर देखील कारखान्यांत होणाऱ्या अधिक नफ्याचे स्वागत करतात. कारण त्या नफ्याचा कांही भाग

त्यांना मिळतो. अशा तऱ्हेने कारखान्यात, वस्तु वापरणाऱ्या गरिबाच्या हितापेक्षां, नफ्याकडे अधिक लक्ष असते; म्हणून समाजातील सगळ्या वर्गांतील लोकांच्या धन–लालसेला लगाम घालणें अत्यावश्यक आहे. हे तत्व समजून प्रत्येकाच्या त्यागवृत्तीचा विकास झाला पाहिजे. या यज्ञांची त्यासाठीं बरीच मदत होईल. समजून-अुमजून जर अंतःकरणपूर्वक असे परिवर्तन झाले आणि सगळीकडे तसेच वातावरण निर्माण झालें तर श्रीमत लोक देखील त्यातून सुटूं शकणार नाहीत.

## संपत्तिदान यज्ञांत गरिबांनी कां सामील व्हावें ?

हिंदुस्थान हा अतिशय गरीब देश आहे हे या आधीच सांगितलें आहे. ज्याला धनिक म्हणतां येअील असा तर लाखांत अेखादा सापडायचा. खाअून-पिअूनसुखी, फार तर १० टक्के लोक असतील. बाकीचे ९० टक्के लोक गरीब आहेत. हे सारे गरीब लोक प्राय. अुत्पादक श्रम करून कसेतरी आपलें पोट भरतात. त्यांचें जीवन कष्टमय असते. म्हणून देशांत जर गरीबी असेल तर साऱ्याना गरीबी सहन करण्यास तयार असलें पाहिजे. अेकाच देशांत राहणाऱ्या कांही थोड्यां लोकांनी अैशआराम व चैनीत राहावें व पुष्कळांनी गरिबीच्या यातना भोगाव्या हें काही न्याय्य नाही. शिवाय श्रीमतांची श्रीमती गरिबांच्या शरीरश्रमावरच अवलंबून असल्यामुळें हा अन्याय असह्य वाटला पाहिजे.

## यज्ञांत सर्वांचा हविर्भाग

असें अेक अुद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून विनोबांनी भूदान व संपत्तिदान-यज्ञ सुरु केला आहे. ह्या अुद्दिष्टाच्या पूर्तीसाठीं ह्या यज्ञांना आदोलनाचें स्वरूप येणें व तें फार व्यापक प्रमाणावर चालणें आवश्यक आहे. जर शेकडा ९० गरीब लोक ह्या यज्ञांत सामील होणार नाहीत तर विचार व्यापक होअूं शकणार नाही व सामाजिक विचार प्रणालीहि बदलूं शकणार नाही. म्हणून श्रीमताना व गरिबांना या यज्ञांत आपापल्या शक्तिनुसार आहुती टाकलीच पाहिजे.

## सारे कसे सामील होतील ?

त्याग, हे या यज्ञांचें मुख्य अंग आहे. स्वार्थत्यागाशिवाय देशाचें अुत्थान होअू शकत नाही. समाजहितासाठी आम्ही अमीराना त्याग करायला सागूं लागलो व शेकडा ९० गरिबानी काहीच त्याग केला नाही तर धनिकांना त्याग करा असें सांगण्याचाहि गरिबांना अधिकार राहणार नाही. कारण स्वत: स्वार्थी राहून अितराना त्याग करायला सागणें निष्फल ठरतें. शिवाय आपल्याला देशातील धन-दौलतीचे फक्त हस्तांतरच करावयाचें नाही, पण मनुष्याला स्वार्थ व लोभापासून परावृत्त करावयाचें आहे. त्याच्या अंत:-करणाची शुद्धि करायची आहे, जेणेकरून माणसाजवळ जी कांही साधन-सामुग्री आहे तिचा त्याने सदुपयोग करावा, समाजाला आपल्या हृदयात स्थान द्यावें, अितराशीं सहकार्य करावे व त्यांना मदत करण्याची त्याची वृत्ति-वाढावी. बहुसंख्य गरिबानी ह्या आंदोलनात भाग घेतला नाही तर अशी हवा निर्माण होणार नाही ज्यामुळें परिस्थितिवश सर्वांना या आंदोलनांत सामील होणें भाग पडेल. म्हणून गरीबहि या आंदोलनात सामील होतील असा विशेष प्रयत्न कार्यकर्त्यांनी केला पाहिजे

परंतु विद्वान आपल्या विद्वत्तेचे मूल्य जसे पैशात करतात तसेंच श्रमजीवि देखील आपल्या श्रमाचे मूल्य पैशातच करीत आहेत. याचा परिणाम असा झाला आहे की सर्वांची पैशासाठीं घोडदौड सुरू आहे. श्रमिक देखील कर्तव्यपरायण राहिलेला नाही. आणि श्रमाची प्रतिष्ठा वाढविणें तर त्याच्याच हातांत आहे. ज्या श्रमात समाजाला जिवंत ठेवण्याची क्षमता आहे त्या श्रमाचें खरे मूल्य जर त्याला कळलें तर देशात आर्थिक क्रांति व्हायला मुळीच वेळ लागणार नाही. जे प्राय: श्रमजीवीच आहेत असे सारे गरीब लोक जर भूदान व संपत्तिदान-यज्ञाचा सिद्धांत नीट समजून घेअून हृदयपूर्वक त्यांत भाग घेतील तर त्यांचे तेज प्रकट होअील व त्याना समाजांत त्यांच्या योग्यतेनुसार महत्त्वाचे स्थान प्राप्त होअील.

परंतु गरिबांची कर्तव्य भावना जागृत न होता त्यांना फक्त आपल्या शक्तीचीच जाणीव झाली तर ही कर्तव्यविहीन शक्ति त्यांची आसुरी संपत्ति ठरेल. आजही ह्यामुळें सामाजिक हानि होत आहे व भविष्यकाळांतहि होत राहील. परंतु यज्ञांत भाग घेण्यामुळें त्यांची त्यागवृत्ति वाढेल व त्यांना आपल्या कर्तव्याचीहि चांगली जाणीव होईल.

## गरिबाने दुसऱ्या गरिबाची आठवण ठेवावी

गरीबी-गरीबीतहि फरक आहे. कांहीना खायलाहि मिळत नाही म्हणून लाचार होऊन दारोदार भटकावें लागत आहे, काहीना अर्धपोटी राहूनच जीवन कंठावें लागत आहे आणि काही अत्यंत काटकसरीनें निर्वाह करीत आहेत अथवा कशीतरी गुजराण करीत आहेत. जे अशाप्रकारें दुःख भोगीत आहेत, त्यांना गरिबीच्या अनुभवामुळें दुसऱ्या गरिबाविषयी सहानुभूति वाटली पाहिजे. परंतु प्रत्येकजण प्रायः दुसऱ्या कुणाची काही पर्वा न करतां आपल्याच स्वार्थात मश्गूल आहे आपापल्या भिन्न भिन्न कार्यक्षेत्रांमुळें श्रमजीवियांच्या समाजात अनेक गट निर्माण झाले आहेत. ह्यापैकीं काही गटांचे मोठमोठे कारखाने, रेल्वे, पोस्ट-ऑफिस आदि क्षेत्रांत संघटन झालें आहे व ते हरताळ–सपाद्वारा समाजाची अडवणूक करून आपापलें उत्पन्न वाढविण्याचा नेहमी प्रयत्न करीत आहेत. खेड्यात राहणाऱ्या करोडो भूमिहीन गरिबांकडे त्याचें लक्ष जात नाही. वस्तुतः हे लोक त्यांच्यापेक्षा कितीतरी अधिक गरीब आहेत व कष्टमय जीवन कठीत आहेत. देशाची संपत्ति तर अखेर मर्यादितच असते. त्यामुळें अकीकडे फक्त काही लोकाचें उत्पन्न वाढत राहिलें तर दुसरीकडे गरीबी वाढत जाईल. अमीरांच्या अधिक धन गोळा करण्याच्या वृत्तीमुळें आज असेच होऊन राहिलें आहे. म्हणून ज्या कुणाजवळ जें कांही थोडेंबहुत असेल त्याचे, आपणापेक्षा अधिक गरीब आहेत त्यांची आठवण ठेवणें व त्याना मदत करणे हें प्रथम कर्तव्य आहे. असें झाल्यावाचून साऱ्या समाजाचें हित होऊ शकत नाही.

## गरिबांनी यथाशक्ति दान द्यावयाचें आहे.

हे यज्ञ गरिबांच्या भल्यासाठी आहेत. परतु त्यांचें कल्याण तेव्हांच होओील की जेव्हा प्रत्येक गरीब दुसऱ्याच्या भल्याचा विचार करील व स्वतः काही त्यागहि करील. गरिबांजवळ विशेष धन-दौलत नसल्याने त्यांच्या त्यागाचे प्रमाण नाममात्रच असेल. परंतु हा त्याग, हृदयांत समाजाला स्थान देअून, समजून अुमजून केलेला असल्यामुळें विशेष फलदायक होओील. धनिक असल्यामुळे जे जास्त भार वहन करू शकतात, त्याच्या त्यागाचे प्रमाण विशेष असलें पाहिजे. अितराच्या त्यागाची मात्रा आपापल्या शक्तिनुसारच असूं शकते.

सध्या सपत्तिदानात साधारणपणें अुत्पन्नाचा अथवा कौटुंबिक खर्चाचा सहावा हिस्सा मागितला जात आहे. पण हा काही कर नव्हें. दाता आपल्या शक्तिनुसार कमी ज्यास्त सकल्प करूं शकतो. आमचें अर्थशास्त्रज्ञ भारतांतील दरडोअी मासिक अुत्पन्न २० रुपअे आहे असें म्हणतात. हा सरासरी आकडा आहे. म्हणजे कांहींचे अुत्पन्न यापेक्षा ही फार कमी आहे आणि काहींचे फार जास्त आहे असा त्याचा अर्थ आहे. कुटुंबातील व्यक्तींची सरासरी पाच मानली, व अेका कुटुंबाचें मासिक अुत्पन्न १०० रु. मानलें, व प्रत्येक व्यक्ति मागें अर्धा आणा सपत्तिदानाचा सकल्प केला तर अेका गरीब कुटुंबाला महिन्याकाठी फक्त तीन रुपये दोन आणेच खर्च करावे लागतील. वर लिहिल्याप्रमाणें यज्ञाच्या महत्वाचा विचार करता गरिबांना काय अेवढ्याशा रकमेचें फार ओझें वाटेल? आजकाल गरीब लोक देखील कांही ना कांही फाजिल खर्च करीतच असतात हें आम्हाला ठाअूक आहे. हॉटेल, चहा, तबाखू, सिनेमा आदिसाठी त्याचा कितीतरी पैसा बरबाद होत असतो. अशा खर्चांत थोडी कपात केली तर ते सपत्तिदानासाठीं थोडीशी रक्कम सहज वाचवू शकतील. त्यामुळें त्यांची व्यसनेंसुद्धां कांही प्रमाणांत कमी होतील. सामाजिक विचार प्रणालीत बदल घडवून आणण्यासाठी त्याना अेवढासा त्याग करण्यास अवश्य तयार झालें पाहिजे. जर त्यांना नीट समजावून दिले

व पटविलें तर हें काम सोपें आहे. बहुसंख्य गरीब लोक जर यज्ञाचा सिद्धांत मान्य करतील तर साऱ्या समाजाचा धन-दौलती संबंधीचा विचार बदलूं शकतो या विषयीं शंका राहणार नाही. म्हणून गरिबानी अत्यंत अुत्साहाने व आनंदाने या यज्ञांत सामील झालें पाहिजे.

## विद्यार्थ्यांनीहि सामील व्हावें

सम्पत्तिदान-यज्ञांत हायस्कूल व कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीहि भाग घेतला पाहिजे अशी अपेक्षा आहे. त्यांनी या यज्ञांचा प्रचार व श्रमदान तर केलेच पाहिजे पण त्याचबरोबर समाजासाठीं स्वतः काही खर्च ही केला पाहिजे. आम्ही काही कमाअी तर करीत नाही फक्त खर्चच खर्च करीत असतो असें विद्यार्थी कदाचित् म्हणतील. तरीपण विद्यार्थी दशेतच विद्यार्थ्यांनी कांही ना कांही त्याग नियमितपणें करण्याची सवय लावून घ्यावी अशी अपेक्षा आहे. विद्या-संपादन करून गृहस्थाश्रमांत पदार्पण केल्यानंतर समाज-सेवेच्या कामास सुरवात व्हावी असा जर त्याचा समज असेल तर तो समज चुकीचा आहे हें त्यांनी ध्यानात ठेवावे. कारण आजवरचा अनुभव असा आहे की ज्यानी विद्यार्थी दशेतच समाज-सेवेच्या कामास सुरवात केली आहे, त्याच्याचपैकीं कांहींनी समाज-सेवेच्या कामाची परंपरा अखंड कायम ठेवली आहे. शिक्षण-कालांत विद्यार्थ्यांचा अुत्तम व अुच्च विचाराशी संपर्क येतो व त्यांच्या योगाने ते प्रभावित ही होत असतात. आणि मग त्यांच्या अंतःकरणांत समाजसेवा करण्याची भावना देखील निर्माण होते. परंतु ज्या भावना आचरणानें दृढ आणि पुष्ट होत नाहीत त्या पुढें टिकत नाहीत व प्रपंचांत गुरफटल्यानंतर तर प्रायः त्या नामशेष होअून जातात. म्हणून विद्यार्थीजीवनांतच सद्गुणांचे पोषण प्रत्यक्ष आचरणानें केले पाहिजे. भविष्यकालाच्या भरवशावर सोडण्या-लायक ही वस्तु नाही.

विद्यार्थी कोणत्या प्रकारें संपत्तिदान-यज्ञांत मदत करू शकतील हा प्रश्न राहतो. त्यांना काही अुत्पन्न नसलें तरी त्यांना खर्च तर करावाच

लागतो. म्हणून या खर्चाच्याच प्रमाणांत त्यांना संपत्तिदानाचा संकल्प करतां येअील. शाळा-कॉलेजांतील खर्च तर फार वाढला आहे. तरीपण जीवनांत साधेपणा आणण्याचा प्रयत्न केला तर बरीच बचत होअूं शकतें. अतः विद्यार्थ्याला, आपल्या अध्ययनकालांत जो कांही खर्च करावा लागतो त्याचा अेक छोटासा हिस्सा, अुदा० रुपया मागें दोन पैसे, संपत्तिदान यज्ञांत खर्च करण्याचा संकल्प सहज करता येअील. आजहि दुष्काळ, महापूर आदि संकटांच्या वेळी विद्यार्थी कोणत्या ना कोणत्या रूपात कांही ना कांही मदत करीतच असतात. अितर गरीब विद्यार्थ्यांनाहि ते मदत करीत असतात. पण हें सारे कधी कधी व नैमित्तिक स्वरूपात होत असतें. म्हणून विद्यार्थ्यांनी जीवनाचें अेक अंग म्हणून संपत्तिदान यज्ञात खर्चाचा अेक हिस्सा नियमितपणें देण्याचा संकल्प करावा व व्यवसायाला सुरवात केल्यानंतर अुत्पन्नाचा यथोचित भाग देण्याच्या संकल्पात त्याची परिणति व्हावी, असें आम्हाला वाटतें.

## यज्ञांचें अुद्दिष्ट : अहिंसक समाज

भूदान-यज्ञानंतर संपत्ति-दान-यज्ञ सुरू झाला. श्रमदान यज्ञाचा आवाज गुंजूं लागला आहे. बुद्धि-दान यज्ञाचे नावहि कधी कधी अैकूं येते. आणि आतां तर जीवन-दान-यज्ञासहि सुरवात झाली आहे. पण ह्या साऱ्या भिन्न-भिन्न वस्तू आहेत काय ? जीवनदान-यज्ञाची कल्पना वेगळी आहे. पण बाकीचे सारे यज्ञ अेकाच वस्तूचें वेगवेगळें पैलू आहेत. ते अलग-अलग, अेक-अेकटे किंवा सर्व मिळूनहि अेक अंतिम वस्तु बनवू शकत नाहीत. कारण ती सारी केवळ साधनें आहेत. मग साध्य वस्तू कोणती ? मानव समाजांत सुख आणि शांतीची स्थापना करण्यासाठी भूतकाळांत अनेक प्रयत्न झाले. त्यामुळें वेळो-वेळीं कांही लाभहि झाला. पण संतोषजनक अवस्था निर्माण झाली नाही. त्यासाठी आजहि प्रयत्न चालू आहेत आणि पुढेहि चालू राहतील. कित्येक देशांत हिंसेच्या आधारावर नवा समाज बनविण्याचे प्रयत्न झालें आणि अजूनहि होत आहेत. कांही देशांनी ह्यासाठी कायद्याचा आश्रय घेणे योग्य मानलें.

समाज कसा असावा ह्यासंबंधीं कांही स्पष्ट आणि कांही अस्पष्ट चित्रें विचारकांच्या नजरेसमोर आज आहेत. ज्या समाजांत कुणाचेहि शोषण होणार नाही व कमीत कमी शासन असेल, व्यक्ति शक्य तितकी स्वतंत्र आणि स्वावलंवी असून आपला विकास करूं शकेल व श्रमनिष्ठ असेल; असा समाज निर्माण व्हावा असें कांही लोकांना वाटतें. आर्थिक व सामाजिक विषमता नाहिशी झाली पाहिजे. स्वार्थाच्या जागीं परार्थ आणि स्पर्धेच्या जागी सहकार्य असावें आणि संयुक्त कुटुंबांत जसा अेक प्रकारचा वंधुभाव असतो तसाच वंधुभाव साऱ्या समाजांत असला पाहिजे. अशा समाजाला सर्वोदय-समाज अथवा अहिंसक-समाज किंवा रामराज्य सुद्धां म्हणता येअील. पण असा समाज कसा वनेल? केवळ भौतिक परिस्थिति वदलल्याने हे साध्य होअील काय ? समाज व्यक्तींचा वनतो. म्हणून व्यक्ति अर्थात् मनुष्य जर वदलला नाही तर केवळ भौतिक परि-वर्तनाने शाश्वत सुख-शांति मिळेल काय ? भौतिक वस्तु ज्याच्या हातांत आहेत त्याची सुधारणा झाल्याशिवाय त्या वस्तूंचा समाजासाठी योग्य रीतीने अुपयोग होअील काय ? हिंसा आणि कायद्याने केवळ भौतिक परिवर्तन होतें, पण हृदय-परिवर्तन होणें ही वेगळी वस्तू आहे. अहिंसक-समाज-रचनेसाठी मनुष्याच्या हृदयात खरेखुरें परिवर्तन झालें पाहिजे म्हणजे माणसांत मानवता आली पाहिजे. हे भूदानादि यज्ञ अशा समाजाची रचना करण्याचें आणि मनुष्याचें हृदय-परिवर्तन करण्याच्या मार्गावरील योग्य पाअुलें आहेत. ह्याशिवाय आणखीहि अनेक गोष्टी कराव्या लागतील. पण ह्या यज्ञांवाचून नव-समाज-रचनेनी अुद्दिष्टें सफल होणें कठिण आहे.

## पण हे शक्य आहे काय ?

पण असा समाज तरी होणे शक्य आहे काय, असा प्रश्न नेहमी विचारला जातो व तें स्वाभाविकहि आहे. कारण हजारों वर्षे अनेक साधु-संतांनी, सर्व धर्मांनी प्रयत्न केला पण कुणालाच यश मिळालें नाही. आपले

सारे व्यवहार बंधुभावनेने करण्याअितकी साऱ्या समाजांतील बहुजनसमाजाची सुधारणा कधीं तरी होअू शकेल काय ? केवळ समजावून सांगण्याने अितकें शुभ-परिवर्तन होअू शकेल ? सम्पत्ति-दान-यज्ञांत मोठ्या प्रमाणात आणि प्रामाणिकपणे लोक भाग घेतील ? रचनात्मक कार्यकर्त्यांच्या मनांतहि असल्या शंका असणे संभवनीय आहे. जर मनांत शंका ठेवून आपण हे काम करू तर हे महान कार्य करण्याअितका अुत्साह आपल्यांत राहणार नाही. म्हणून ह्या प्रश्नाचा विचार करणे योग्य होअील. हे काम सोपें नाही, हे आम्हाला चांगलें ठाअूक आहे. परन्तु ज्या महान अुद्दिष्टांसाठी हे यज्ञ चालू आहेत ती अुद्दिष्टें सिद्ध करण्यालायक आहेत कीं नाही हा प्रथम विचाराचा प्रश्न आहे. जर तें तसें असतील तर त्यासाठी आटोकाट प्रयत्न करण्यांतच पुरुषार्थ आहे. काम जितकें कठिण असते तितकाच प्रयत्न त्यासाठी अधिक करावा लागतो. त्याला सोडून देणें माणसाला शोभणार नाही. दुसरी गोष्ट अशी आहे की सर्वोदयाचें स्वप्न कधीच साकार न झाले तरी हे यज्ञ सुद्धां जास्तीत अत्यंत कल्याणकारी आहेत. म्हणून ते यशस्वी करण्याच्या प्रयत्नांत कसर राहूं नये.

## अशक्य नाहीं

साधु-संतांचें प्रयत्न वाया गेले नाहीत. त्यांचें मानव-समाजावर फार मोठें ॠण आहे. कारण त्यांनी जर सदाचाराचें शिक्षण दिले नसते तर आमची काय दशा झाली असती ? त्यांनी अेका मुक्कामापर्यंत आपल्याला पोंचविलें आहे, जियून दीप-स्तंभाप्रमाणे त्यांची शिकवण आम्हाला चेतावणी देत पुढचा मार्ग दाखवीत आहे. त्यांचीच शिकवण आजच्या मापेंत आपल्याला समजून घ्यावी लागणार आहे. माणसाच्या सुधारणेचा आणि माणसाला नीतिमान बनविण्याचा मूलभूत आधार म्हणून त्यांनी आम्हाला आध्यात्मिक दृष्टीने हें समजावून सांगितलें. पण आता समाज अितका गुतागुतीचा झाला आहे की व्यावहारिक दृष्टिकरेहि आपल्याला लक्ष द्यावें लागेल. 'अिशावास्य-मिदम्' हे सारे खरे आहे. काही संप्रदायांत 'माझे जे कांही आहे तें अीश्वरार्पण

केलें आहे', असे संकल्पहि आहेत. तरीहि ह्या जगांतील ओश्वराचा प्रतिनिधी कुणाला मानायचें असा प्रश्न राहतोच. मी स्वतःलाच ओश्वराचा प्रतिनिधी मानून सम्पत्तीचा अधिक अुपभोग केला तर कुणी मनाओ तरी कां करावी ? पण ओश्वराचें खरे प्रतिनिधित्व समाजाकडेच असले पाहिजे. कारण आमच्या-जवळ जें कांही आहे तें समाजाच्या कृपेचें फळ आहे. म्हणून त्याचा समाजालाच लाभ मिळाला पाहिजे हे आपण समजलें पाहिजे. ही काल्पनिक गोष्ट नव्हे, वस्तुस्थिति आहे. ह्या पुस्तकांत हेंच तत्व समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. साधु-संतांनी सर्वांशीं समभावाने वागा असें तर सांगितलें, पण त्याचबरोबर व्यक्तीला जें कांही दुःख भोगावें लागतें ते त्याच्या दैव-गतिमुळें भोगावें लागते असेंहि सांगितलें. वस्तुतः पुष्कळशी विषमता अथवा दुःख मनुष्यकृत समाजव्यवस्थेमुळें निर्माण झालें आहे. म्हणून मनुष्याच्या प्रयत्नाने त्यांत परिवर्तन होअूं शकतें. म्हणजे सर्वांनी सुखहि वाटून घ्यायचें आणि दुःखहि वाटून घ्यायचें, असा विचार करण्याची वेळ आता आली आहे. कारण कांही थोडया लोकांनी सुखांत व आरामांत रहावें आणि बाकीच्या करोडो लोकांनी दुःखांत रहावें हें न्याय्य नाहीं.

तरी पण मनुष्याची स्वार्थ-वृत्ति अितकी प्रबल आहे कीं त्याच्या सुधारणेचा मार्ग जर व्यक्तीच्या स्वाधीन ठेवला तर वाओटाच्या निर्मूलनाची फारशी आशा करतां येणार नाही. माणसाच्या मानवतेवर आपल्याला विश्वास ठेवला पाहिजे. पण अधिकांश समाजाची लवकर सुधारणा कशी होओील, हा प्रश्न आहे. ह्या दृष्टीनें मनुष्य आपल्या विवेकाने व कांही अंशी समाजाच्या विचारसरणीच्या दावाने सुधरत असतो हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. गुन्हेगार जमातीत चोरी करणे दोषास्पद मानलें जात नाही. पण बाकीच्या साऱ्या समाजांत चोरी करणे हा दोष आहे असें मानलें जातें. ही गोष्ट ज्या समाजांत आपण राहतो त्या समाजातील विचार-प्रणालीमुळें झालेली आहे. जर प्रथम लिहिल्याप्रमाणें संपत्ति आणि विद्यावलाविषयक सामाजिक विचार-प्रणालींत बदल झाला तर त्यांचा समाजहितासाठी अुपयोग

होणें बरेच संभवनीय आहे. साम्यवादाच्या अर्ध्या जगाने हा विचार मान्य केलेला आहे हे सुद्धां आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. भांडवलवादी जगांतहि समाज कल्याणकारी असला पाहिजे, प्रत्येकाला सर्व-सामान्य गरजेच्या वस्तू मिळाल्याच पाहिजेत आणि कुणीहि दुःखांत असू नये असें मानलें जातें. मग साऱ्या जगांत जी हवा आहे त्यापासून भारत तरी कसा अलिप्त राहील? उलटपक्षी भारतांतील शेंकडा ९० लोक दरिद्री असल्याने हा विचार दृढ-मूल होणे कठिण नाही. त्या गरिबांना आपल्या हक्काची भाषा तर कळतें, पण त्यांना त्यांच्या कर्तव्याचीहि जाणीव करून द्यायची आहे. यज्ञांत सहकार्य करण्यासाठी त्यांना प्रत्यक्षतः आर्थिक त्याग तर थोडासाच करावा लागणार आहे, पण त्यांना त्यागाचें महत्व समजणें आवश्यक आहे. स्वतः थोडासा तरी त्याग केल्यावाचून फक्त श्रीमंतांकडूनच त्यांनी त्यागाची अपेक्षा केली तर काम होणार नाही. म्हणून गरिबांनीहि ह्या यज्ञात सामील झालें पाहिजे ह्यांवर अधिक जोर दिला जात आहे.

विचारांत मोठी शक्ति असते. जर बहुजन समाजाचा विचार-प्रवाह योग्य दिशेने गेला तर समाजांत परिवर्तन होअील ह्या विषयी शंका राहूं नये. पण ह्या प्रक्रियेला वेळ किती लागेल? कुठवर धीर धरायचा? क्रांति अशा मंद गतीनें होत नाही, असें विचारलें जाते. मग काय हिंसेने आणि कायद्याने लवकर काम होते? अनुभव असा आहे कीं ह्या दोन्ही प्रकारच्या प्रक्रियांतहि बराच वेळ लागतो आणि त्याशिवाय अेक व्यक्ति म्हणून माणूस जसाच्या तसाच बरा-वाअीट राहतो तें वेगळेच. आजच्या काळांत विचार-परिवर्तनहि फार वेगानें होत आहे. दूर-दूरच्या देशांशी आपला संपर्क वाढत आहे. प्रथम ज्या कामाला शंभर वर्षे लागत असत तेंच काम आता १०-१५ वर्षांत होअू शकते. जुन्या जमान्यांतील प्रक्रियेचें स्वरूप प्रायः व्यक्तिगत असे, पण आतां तिला सामूहिक रूप मिळालें आहे. विषमता असूं नये, समानता असावी असें आतां बहुजन समाज मानूं लागला आहे. असें असलें तरी आम्ही कायदा नाकारीत तर नाही, परंतु बहुजनाचें मानस बदलल्यानंतरच कायदा यशस्वी

होअू शकतो. म्हणूनच समजूत घालून आणि यज्ञाचें आचरण करवून घेअून समाज बदलविण्याचा प्रयत्न चालू आहे. शिवाय हिंसा आणि कायद्यावाचून भौतिक परिस्थिति व मानस बदलविण्याचा जनतेजवळ दुसरा अिलाजच नाही, असें मानणें चुकीचें आहे. कारण सत्याग्रह हिंसेचें स्थान घेअू शकतो आणि त्यामुळें भौतिक स्थितिबरोबरच मनुष्याचें मानसहि बदलू शकतें हे महात्माजींनी प्रयोग करून सिद्ध केलें आहे. भारतांत आज जनतंत्रात्मक राज्यसत्ता चालू आहे. या पद्धतींतही निरनिराळे पक्ष आपापली विचार-प्रणाली जनतेला समजावून सांगून जनतेचा विचार बदलण्याचा प्रयत्न करीत असतात. वस्तुतः ही प्रक्रिया देखील केवळ कायदे बनविण्याची नसून विचार-परिवर्तनाचीच आहे.

वर लिहिलेल्या बाबींचा खोल विचार केला तर महात्माजी आणि विनोबांच्या मार्गाने आपण गेलो तर आपली अुद्दिष्टें साध्य होअू शकतील असा विश्वास कार्यकर्त्यांच्या मनांत निर्माण झाला पाहिजे. ही न्यायाची हाक आहे व युगाची मागणी आहे. ती टळू शकत नाही. अहिंसेचा मार्गच कल्याणकारी आहे.

### वैयक्तिक मालकी हक्क

वर लिहिल्याप्रमाणें व्यक्तिगत सम्पत्तीच्या मालकी हक्कांचें बाबतीत आमूलाग्र विचार-परिवर्तन होणें आवश्यक झालें आहे. नीट विचार केला तर धन कमाविणें तर दूरच राहिलें पण सामाजिक सहकार्य व मदतीवाचून मनुष्य जिवंतहि राहूं शकत नाही. कुणाला आपल्या पुरुषार्थाची घमेंड असली तर त्याने जंगलांत अेकटें राहून बघावें. मनुष्य समाजांत राहतो, अेकमेकाला अेकमेकाची मदत होतें तेव्हां कुठें त्याची जीविका चालतें. गरीब मजुराला सुद्धा मालक कांही काम देतो तेव्हांच त्याचें पोट भरते व त्याच्या मदतीनें मालकाचें काम होतें. व्यापारी कांही वस्तू विकून कांही वस्तू खरेदी करतो तेव्हां कुठें त्याचा व्यापार चालतो. कारखान्यांत सुद्धां अनेक लोकांची मदत मिळतें तेव्हां कुठें कारखाना सुरळीतपणें चालतो. आजाऱ्यांमुळें डॉक्टरांचा

आणि भांडणतंटयामुळे वकीलांचा व्यवसाय चालतो. त्याचप्रमाणे सारे धंदे परस्पर सहकार्याने चालतात व माणसांची अुपजीविका चालते. जर माझें शरीरबल, बुद्धिबल आणि सम्पत्तिबल समाजावरच अवलंबून आहे तर ह्यांवर वैयक्तिक मालकी अथवा अधिकार आहे असें समजणे न्यायसंगत होओील काय?

गरजेपेक्षां जास्त पैसा कमाविणें आणि संपत्तीवर वैयक्तिक मालकी हक्क सांगणें योग्य नव्हे. हा निर्णय, स्वार्थ-निरपेक्ष विचार करता आपल्याला मान्य करावा लागेल. मालकी हक्काचें समाजहितात विसर्जन व्हावें म्हणजे आपल्या सम्पत्तीचा व बुद्धीचाहि अुपयोग समाजाला व्हावा ही मागणी न्याय्य आहे. आणि कायदा व सामाजिक मान्यतेनुसार जी व्यक्तिगत मालकी हक्काची प्रणाली सुरु आहे त्यात परिवर्तन होणें आवश्यक आहे. त्यासाठी संपत्ति व्यक्तीची न राहतां, समाज-हितासाठी तिचा अुपयोग झाला पाहिजे, अशी धारणा झाली पाहिजे.

## कांही गैरसमज

काही धनिक लोकांशी संपत्ति-दान-यज्ञाची चर्चा केली, तेव्हां आम्ही तर सरकारला जबर कर देत आहोत, ज्याचा असेरीस जनतेच्या हितासाठीच अुपयोग होतो; मग हेंच संपत्ति-दान का मानलें जाअू नये, असें त्यांनी म्हटलें. त्याचप्रमाणें संपत्ति-दान हे सरकारच्या आर्थिक वसूलीचें प्रतिद्वंद्वी आहे अशी चर्चा सुद्धां कधी-कधी चालते. सरकारच्या वसूलीने श्रीमंतांचे अुत्पन्न घटतें तसेंच संपत्ति-दान-यज्ञामुळेंहि श्रीमंतांचें अुत्पन्न कमी होतें. म्हणजें दोन्ही प्रक्रियांचें आपसांत द्वंद्व आहे. म्हणून संपत्ति-दान-यज्ञ योग्य नाही. वास्तविक युक्तिवाद यज्ञाचा योग्य अर्थ न कळल्याने निर्माण झाले आहेत. सरकारकडे जाणारा पैसा स्वखुशीनें नाही, पण जबरदस्तीने जातो. देणारा नेहमी देणें टाकू अिच्छित असतो. त्यामुळें आर्थिक व्यवस्थेंत शुद्धतेअैवजी अशुद्धता वाढते. वरील युक्तिवादात भूदान आणि संपत्तिदान-यज्ञ हे केवळ भौतिक वस्तू हस्तान्तरित करण्यासाठी आहेत असें मानून चेतलें आहे. वस्तुतः अुद्दिष्ट वेगळेंच आहे. ह्याचें विवेचन वर केलेंच आहे.

विभाग चौथा

# संपत्ति-दानाचें प्रमाण आणि उद्दिष्ट

कुटुंबांतील असमांची सरासरी संख्या पांच मानून दरिद्रीनारायणाच्या रूपात बाहेरच्या अेका व्यक्तीला हृदयांत स्थान मिळावे म्हणून तूर्त संपत्ति-दान-यज्ञांत आपल्या अुत्पन्नाचा कमीत कमीं सहावा हिस्सा द्यावा अशी सूचना आहे.

हा हिस्सा केवळ १ वर्ष अथवा अेकच वेळ द्यावयाचा नसून जीवनभर द्यावयाचा आहे. कारण जर आम्ही जीवनभर संपत्ति आपल्याजवळ ठेवली किंवा जीवनभर कमाअी करीत राहिलो तरी याआधींच दाखविल्याप्रमाणें ती सारी समाजाचीं देणगी असल्यामुळें समाजाचा तीवर सदोदित हक्क राहील.

स्थूल दृष्टीने पाहिल्यास आयुष्यभर देत राहणें अवघड वाटणें शक्य आहे. परंतु ही अंतःकरण-शुद्धीची प्रक्रिया आहे. तिने आमचे जीवन संयमी होअील व स्वयंप्रेरणेने स्वतःवर नियंत्रण ठेवल्या जाअील. असे आज घडत नसल्यामुळें समाजांत काय चालले आहे ? ज्याच्याजवळ अेक कोटी रुपये आहेत ते दोन करोड जमविण्यासाठी आटोकाट प्रयत्न करीत आहेत. त्यासाठी साधनांच्या शुद्धाशुद्धतेचा क्वचितच विचार केला जातो. अितके धन मिळविण्याची काय गरज आहे ? अितक्या धनाचे काय करणार ? यांत स्वतःचे कल्याण आहे कीं नाही, ह्याचा विचार किती लोक करतात ? श्रीमंतांना आपल्या कामाच्या व्यापामुळें फुरसत नाही, गरीबांना पोटाच्या विवंचनेमुळें सवड नाही आणि मध्यमवर्गीय लोकांना वाढत्या महागाअीनें त्रस्त करून टाकलें आहे. ह्यामुळें देशसेवेच्या कामासाठीं अपवाद म्हणून फार थोडे लोक मिळतात. अशा स्थितीत आमची प्रगति कशी होअील ? वास्तविक ज्यांच्या कुटुंबांतील काही व्यक्ति कामकाज सांभाळू शकतात अशा धनिकांना असें करणें सर्वांत अधिक सोयीचें आहे. त्यांनीं आपल्या धार्मिक परंपरेनुसार

वानप्रस्था-श्रमाचा स्वीकार करून गरीबांची सेवा करण्यास त्यांनी सिद्ध झालें पाहिजे. परंतु संसाराची आणि धनाची लालसा अितकी तीव्र आहे कीं मरेपर्यंत ह्या बंधनांतून सुटण्याचा आम्ही विचार सुद्धा कधी करीत नाहीं.

सम्पत्ति-दानाच्या हिश्याची रक्कम दुसऱ्याच्या स्वाधीन करायची नाही; स्वतःच खर्च करून त्याचा हिशेब पाठवावयाचा आहे. विनोबाजींनीं या खर्चाचें तीन अुद्देश सांगितलें आहेत.

(१) भूदान-दान-यज्ञ आंदोलनामुळे ज्या भूमिहीन शेतकऱ्यांना जमीन देण्यांत येअील त्यांना अितर सामुग्री पुरविणे.

(२) या यज्ञांत किंवा ग्रामसेवेचें काम करणाऱ्या गरीब कार्यकर्त्यांचा अुदरनिर्वाह करणें.

(३) सत्साहित्याचा प्रचार करणें.

या योजनेंत दात्यावर पूर्ण विश्वास ठेवण्यांत आला आहें. विश्वस्तवृत्तीची विचार-प्रणाली अमलांत आणण्याचें तें अेक यशस्वी पाअूल ठरेल.

## सम्पत्तिदानाचा समयोचितपणा

श्रीमंत लोक कांहींना कांही तरी दान करीतच असतात. कांही तर आपल्या संपत्तीच्या सहाव्या हिश्यापेक्षां अधिक दान देत असतील; पण हे दान स्वयंप्रेरणेने होत नसून बहुधा परप्रेरित असतें. ज्या कामासाठी दान मागतात ते काम त्यांना पसंत नसले तरी कांही विशिष्ट लोक दान मागायला आलें तर नकार देतां येत नाही. असें दान, दाता आणि याचक दोघांनाहि अप्रिय असते. ह्या अैवजीं दरवर्षी अुत्पन्नाच्या अमुक अितक्या हिश्याचें दान करावयाचें असा नियम केला तर कोणकोणती कामें दान करण्याजोगी आहेत याचा दात्याला विचार तरी करतां येअील. जें काम त्याला आवडेल त्या कामासाठीं स्वतःच समजून अुमजून तो आपल्या दानाची रक्कम खर्च करील आणि आपले प्रिय अुद्दिष्ट सफल झाल्याचे पाहील. दरवर्षी आपल्या मिळकतीचा अेक निश्चित भाग दानधर्मासाठीं अलग ठेवण्याची कांही व्यापाऱ्यांची

परंपरा आहे. कांही जैन लोक ठरलेल्या मर्यादेपेक्षां अधिक संपत्तीचा संग्रह न करण्याचें व्रत घेतात. अशा पद्धतींना संपत्ति-दान-यज्ञ अधिक व्यापक रूप देऊं पाहत आहे.

पण जुन्या पद्धतीत सम्पत्तीवर आपला हक्क आहे असे समजून, दुसऱ्यांना दया म्हणून मदत करण्याची गोष्ट होती. अुलटपक्षी सम्पत्ति-दान-यज्ञांत आपण सम्पत्तीचें मालक नाही, ती समाजाची आहे, असें समजून खर्च करायचा आहे हे आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. जुन्या पद्धतीत अेक मोठा दोष आहे कीं जो काळाशीं सुसंगत नाही. कारण जे दान 'देशे कालेच पात्रेच' असेल तेंच सात्विक गणल्या जातें! विनोबाजीनी संपत्ति-दान-यज्ञाचें जे अुद्देश सांगितलें आहेत, ते देशाच्या संध्याच्या परिस्थितीत अत्यंत अुपयुक्त आहेत. आज श्रीमंत जे दान करतात त्याचा प्रायः शहरांतील मध्यमवर्गीय लोकांनाच लाभ मिळतो. खरोखर दान गरीबातल्या गरीबाला मिळाले पाहिजे. विशेषतः खेड्यांतील गरिबांना ज्यांची संख्या ८० टक्के आहे. त्याच बरोबर दान घेणारा पंगू बनणार नाही, पण कामाला लागून आपला निर्वाह आपल्या श्रमाने आणि सन्मानाने चालवू शकेल याकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे. भू-दान-यज्ञाने आणि सम्पत्ति-दान-यज्ञाने हे काम फार चांगल्या रीतीने साधते.

### सम्पत्ति-दान-यज्ञाचा थोडा तपशील

बोधगयेच्या सर्वोदय-समेलनांत ता. १९, २० अेप्रिल १९५४ रोजी आणि तदनंतर २३ अेप्रिल, १९५४ रोजीं पू. विनोबाबरोबर सर्व-सेवा-संघाच्या प्रमुख व्यक्तींशी सम्पत्ति-दान-यज्ञाविषयीं जी चर्चा झाली तिचा सारांश खाली दिला आहे.

सिद्धान्तः— भूमि-दान-यज्ञामागें जो सिद्धान्त आहे तोच सम्पत्ति-दान-यज्ञाच्या मुळाशीहि आहे. म्हणजे जमीन जशी कुणाच्या मालकीची न राहतां समाजाच्या मालकीची झाली पाहिजे. तसाच सम्पत्तीवरहि कोणत्याहि

व्यक्तिचा अेकाधिकार नसून ती सम्पत्ति समाज-हितासाठी आहे असें मानलें पाहिजे. समाज-हितात व्यक्ति-हिताचाहि अंतर्भाव होतो. म्हणजे व्यक्तीने साध्या जीवनाकडे दृष्टि ठेवून आपल्या निर्वाहासाठी त्याला तिचा अुपयोग करतां येअील. मतलब असा कीं मनुष्याजवळ जें कांही शारीरिक, बौद्धिक किंवा अन्य सम्पत्तीचें बल आहे ते सारे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे समाजाकडून मिळालें आहे. म्हणून त्यातून आपल्या निर्वाहासाठी योग्य अितका अुपयोग करुन, बाकीच्या सर्व सम्पत्तीचा अुपयोग समाजहितासाठी झाला पाहीजे. ही झाली सम्पत्तीच्या अुपयोगाची गोष्ट, पण जिथवर सम्पत्ति प्राप्त करण्याचा प्रश्न आहे त्याविषयी असें म्हणतां येअील की परिश्रमपूर्वक, जमीन कसण्याची ज्यांची अिच्छा आहे, त्यांच्याच जवळ कसू शकेल अितकीच जमीन असावी असें जमीनीविषयी ज्याप्रमाणे आपण मानतो त्याचप्रमाणे जमीनीशिवाय अन्य क्षेत्रांतहि अुत्पादक शरीर-श्रम हेंच अुपजीविकेचें साधन असलें पाहिजे.

**सम्पत्ति-दानाचें स्वरूपः—** वर लिहिलेला विचार प्रस्थापित करुन अमलांत आणण्याच्या दृष्टीने सध्या दात्याने आपल्या कमाअीचा किंवा हें शक्य नसलें तर आपल्या कौटुंबिक व्ययाचा-खर्चाचा अेक हिस्सा समाजाला अर्पण करावा असे सम्पत्ति-दान-यज्ञाचें स्वरूप ठेवले आहे. हा हिस्सा व्यक्तीच्या सम्पत्तीच्या परिमाणावर अवलंबून असावा आणि त्यात अुत्तरोत्तर वाढ व्हावी. दरिद्रिनारायणाला आपल्या कुटुंबाचा सहावा सदस्य मानून निव्वळ अुत्पन्नाचा अेक हिस्सा आणि व्ययाचा हिस्सा द्यायचा असेल तर पांचवा हिस्सा हे परिमाण मानलें जावें. कौटुंबिक खर्चांत खाणे-पिणे, राहणें ह्याशिवाय मुलांचें शिक्षण, विवाह आदींचा खर्चहि सामील आहे असें मानलें पाहिजे. सहावा हिस्सा मागितला जात असला तरी हा कांही कर नाही. त्यामुळे दाता आपल्या अिच्छेनुसार कमी-जास्त हिस्साहि देअू शकतो. तरीहि ज्यांची मिळकत अधिक आहे त्यांनी फारसा फरक करूं नये. ज्यांची कमाअी सर्वसाधारण निर्वाहा अितकीच किंवा त्यापेक्षाहि कमी आहे त्यांनीहि सम्पत्ति-दानांत अवश्य सामील

झालें पाहिजे. पण त्यांचा हिस्सा प्रतीकात्मक असेल. शेतकऱ्याला आपल्या सम्पत्ति-दानाचा हिस्सा धान्याच्या रूपातहि देतां येअील.

### दानाची काल-मर्यादा

सम्पत्ति-दानाचा सकल्प जन्मभरासाठी केला पाहिजे. कारण ही अेक शुद्ध जीवनाची साधना आहे. अशा प्रकारच्या सम्पत्ति-दानामुळें समाजहिताबरोबरच व्यक्तीचीहि आध्यात्मिक प्रगति होणार असल्याने प्रत्येकाला त्यासाठी सतत तीव्र प्रयत्न केला पाहिजे. जर सुरवातीलाच जन्मभरासाठी संकल्प करण्याचें साहस होत नसेल तर पहिला हप्ता म्हणून निदान पाच वर्षांसाठी तरी संकल्प केला पाहिजे आणि असे करताना पाच वर्षांच्या अनुभवानंतर पुढेंहि सकल्प कायम ठेवायचा आहे आणि त्याची मुदतहि वाढवावयाची आहे, असा अिरादा असला पाहिजे. जर कमाअी वाढली तर सम्पत्ति-दानांत देण्याचा हिस्साहि वाढला पाहिजे हे आपण लक्षात ठेवलें पाहिजे. कमाअी अेकाअेकी फारच घटली तरच हिस्सा कमी करण्याचा प्रश्न निर्माण होअील.

### सम्पत्ति-दानाचा खर्च

सम्पत्ति-दानाची रकम दुसऱ्या कुणाला द्यायची नाही. दात्याला स्वतःच खर्च करायची आहे. फक्त वर्षातून अेक वेळ सर्व-सेवा-संघाला त्याचा हिशेब पाठवायचा आहे. सम्पत्ति-दानाच्या खर्चाची विनोबानी खालील अुद्दिष्टे सांगितली आहेत.

(१) ज्या भूमिहीनांना जमीन दिली जाअील त्याना बी, बैल, विहीर आदि साधन-सामुग्रीसाठी मदत करणे.

(२) त्यागी सेवक वर्गाला अल्पतम निर्वाह-व्यय देणें.

(३) सत्साहित्याचा प्रचार करणें.

ह्याशिवाय भविष्य-काळांत विनोबा अथवा सर्व-सेवा-संघ दुसरी अुद्दिष्टे वाढवूं शकेल. ह्या अुद्दिष्टांपैकी कोणत्यावर किती खर्च करायचा हे दात्याच्या अिच्छेवर अवलंबून आहे. ह्या अुद्दिष्टांशिवाय अन्य सार्वजनिक समाजहिताच्या

कार्यांत आम्ही खर्च करतो असें कित्येक सज्जनांचें म्हणणे आहे. म्हणून अशी व्यवस्था सुचविण्यांत आली आहे की दात्याने आपल्या दानाचा १/३ भाग आपल्या अिच्छेनुसार दुसऱ्या सार्वजनिक समाज-हिताच्या कार्यांत खर्च करावा आणि अुरलेला २/३ हिस्सा मात्र संपत्ति-दानाच्या वर लिहिलेल्या अुद्दिष्टांनुसार खर्च करावा.

### फंडाला प्रोत्साहन द्यावयाचें नाही

भूदान-यज्ञाच्या कामांत आर्थिक मदत करण्याची दाते लोकांची अिच्छा असते, परंतु लांब मुदतीसाठी दरवर्षी संपत्ति-दान-यज्ञाच्या रूपात संकल्प करण्याची त्यांची तयारी नसतें. सम्पत्ति-दान-यज्ञाच्या संकल्पावाचून फक्त आर्थिक मदत करणे म्हणजे अेक प्रकारचा फंडच म्हटला पाहिजे. पण असल्या फंडाला प्रोत्साहन द्यायचें नाही आपल्याला जो काही प्रयत्न करायचा आहे तो सम्पत्ति-दान-यज्ञासाठीच करायचा आहे ह्यांत अेक अपवाद असा आहे की ज्यांना अेकच वेळ दान द्यायचें आहे त्यांनी साधन-दानाच्या रूपांत म्हणजे बैलजोडी, नांगर, अवजारें, बी, बियाणे, विहिरीच्या रूपांत द्यावें. ह्यांतहि दात्याला कुणाला पैसे देण्याचें काम पडू नये, त्याला स्वतःच साधन-सामुग्रीची गरीब भूमिहीन किसानांना सरळ मदत करता येअील अशी व्यवस्था श्रेयस्कर मानली जाअील. असे करणे कांही ठिकाणी शक्य झाले नाही तर प्रांतिक-भूदान-समित्या दात्यांना मार्गदर्शनहि करतील आणि आपलें सहकार्यहि देतील. जर ह्या संबधांत कुठे पैसा ठेवावाच लागला तर तो पैसा सर्व-सेवा-संघाची स्वीकृति मिळाली तर सर्व-सेवा-संघाजवळच ठेवणे अुचित-योग्य होअील.

### कार्यकर्त्यांचा निर्वाह-व्यय

वर लिहिलेल्या अुद्दिष्टांत सेवेचें काम करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या निर्वाहाची गोष्ट लिहिली आहे. हे सेवक मुख्यतः ग्रामसेवेंत अथवा भूदान-यज्ञ-कार्यांत व्यस्त असले पाहिजेत. त्याना सर्व-सेवा-संघांत दानाची रकम मिळाल्यानंतर कार्यकर्त्यांना निर्वाह-खर्च देण्याची व्यवस्था असावी. भिन्न-भिन्न क्षेत्रांत ह्या संबंधीं कशी व्यवस्था करावी हे सर्व-सेवा-संघाने ठरवावें.

### सत्साहित्य-प्रचार

साहित्य-प्रचाराच्या बाबतीत साहित्य मोफत वाटण्याची पद्धति असूं नये. कमीत कमी किमतीत साहित्य विकावें. त्यांत नफाखोरीला मुळीच स्थान असूं नये. लागत किमतीपेक्षांहि कमी किमतीत देखील साहित्य विकलें जाअूं शकतें. अेखाद्या विशिष्ट वर्गाला—जसे विद्यार्थी किंवा कार्यकर्त्यांना—अधिक सूट दिली जाअूं शकते. सार्वजनिक पुस्तकालयांना अथवा वाचनालयांना मोफतहि देतां येअील. सत्साहित्यांत कोणत्या पुस्तकांचा समावेश व्हावा ह्याचा विनोबां-कडून निर्देश मिळावा. अशा प्रकारच्या साहित्याची अेक सूची बनली पाहिजे.

वर लिहिलेल्या सम्पत्ति-दान-यज्ञाच्या अुद्दिष्टांपैकी कोणत्याहि अुद्दिष्टाच्या पूर्तिसाठीं काय केलें पाहिजे ह्याविषयीं जर दात्याला माहिती हवी असेल तर भूदान-समित्यांनी त्याचे मार्गदर्शन करावें आणि अुद्दिष्टाच्या सफलतेसाठी सहकार्यहि द्यावें.

### सम्पत्ति दानाचें कांहीं विशेष अुपयोग

जर अेखाद्या सवर्ण अिसमाने अेखादा हरिजन बालक आपल्या घरांत ठेवून त्याची संपूर्ण जबाबदारी स्वीकारली तर त्या प्रमाणांत तो खर्च म्हणजे सम्पत्ति-दान मानलें जावें.

ज्या ठिकाणी संस्थेतील कार्यकर्ते अथवा शिक्षक आपल्या वेतनात अधिक श्रेणीनुसार बराच फरक असूनहि अेकत्र राहतील आणि सर्वांचें अुत्पन्न अेकत्रित करून नंतर प्रत्येक कुटुंबांतील सदस्य-संख्येनुसार आपसात वाटप करतील तर तें संपत्ति-दानाचे अुत्तम रूप मानलें जाअील. मग समिलित कोशांतून अेक प्रतीक म्हणून अल्पसे दान दिलें तरी चालेल.

गरिबांकडूनहि संपत्ति-दान मागितलें जात असल्यामुळें त्यांच्या दानाची रकम लहानच राहणार आहे. त्या रकमेचा वर लिहिलेल्या अुद्दिष्टांनुसार खर्च करणे दात्याला मुश्किलीचें वाटेल. जिथे दानाची रकम वार्षिक २५ रु० पर्यंत असते तिथें ही व्यवस्था सुचविली आहे.

खादी, ग्रामोद्योग ही आमच्या नव-समाज-रचनेची आवश्यक अंगें आहेत. तेव्हां त्यांचा व्यापक प्रसार झाला पाहिजे. खादी आणि ग्रामोद्योगाच्या वस्तूसाठी अुत्तरोत्तर वाढता बाजार मिळावा ह्या दृष्टीनें—

(क) जो खादीधारी नाही त्याने जर सालीना ५० रुपयापर्यंत प्रमाणित खादी खरेदी केली तर खरेदी-मूल्याच्या अर्धे संपत्ति-दान मानलें जावें.

(ख) ग्रामोद्योगी तेल, तांदूळ, साखर, जोडे आणि गायीच्या तुपांच्या खरेदी किंमतीचा चवथा हिस्सा संपत्ति-दान मानला जावा.

(ग) हातानें दळलेले पीठ वापरण्याच्या प्रयोगांत जर मजुरांकरवी दळून घेतलें असेल तर अेक आणा दोरापर्यंतची सारी मजूरी संपत्तिदानांत मोजली जावी.

(घ) विचार-प्रचार हा आमच्या सर्व कामाचा आधार असल्याने हिंदी मासिक "सर्वोदया"ची पूर्ण वर्गणी आठ रुपये हे संपत्ति-दान गणले जावें.

**विविध**:—चर्चेच्या दरम्यान असाहि अेक प्रश्न अुपस्थित झाला कीं व्यापारी देव-घेवीत लोकांकडून अनिवार्य म्हणून धर्मादायासाठी कांही रकम वसूल केली जातें. ह्या रकमेच्या अुपयोगाचें काही निश्चित अुद्दिष्टहि नसतें. तर अशी रकम ज्या व्यापाऱ्याजवळ जमा झाली आहे ती त्यांना संपत्ति-दानांत देतां येअील काय ? अशा रकमेंतून संपत्ति-दान दिलें जाअू नये असें मत पडलें.

आणखीहि अेक असा प्रश्न निर्माण झाला की ज्याच्याजवळ बरीच जमीन आहे, पण ज्याला भूदानात जमीन द्यायची नसून संपत्ति-दान द्यायचें असलें तर तें दान घेतलें जावें की नाही ? तें दान घेअू नये असे मत पडलें.

**विनंती**:—सर्वोदय-समेलनात तर विनंती केलीच होती पण पुन्हां साऱ्यांनी मग ते धनिक असोत की गरीब संपत्ति-दानात सहकार्य दिलें पाहिजे अशी विनंती करीत आहोत. विशेषतः राज्य-सत्ताधारी व सरकारी अधिकारी, व्यापारी व अुद्योगपति आणि बुद्धिप्रधान व्यवसायात असलेल्या लोकाकडून विशेष अपेक्षा आहे. मंत्रीगण, कायदे मडळांचे सभासद, राजकीय व सामाजिक पुढारी आदि लोकांवर समाज-हिताची विशेष जबाबदारी आहे. म्हणून

त्यांनी संपत्ति-दान-यज्ञांत अवश्य सहकार्य दिलें पाहिजे. त्यांनी स्वतः या यज्ञांत सामील होऊन अितरांना प्रेरणा द्यावी.

**हिश्याची परिभाषा**

ज्यांचें अुत्पन्न निर्वाहाअितकेंच अथवा त्यापेक्षाहि कमी आहे अशा लोकांनी सुद्धां सम्पत्ति-दान-यज्ञांत सामील झालें पाहिजे असें मी वर म्हटलें आहे. त्यांचा हिस्सा अर्थातच प्रतीकात्मक असेल. परंतु गरीबांचा कितवा हिस्सा असावा व अधिक अुत्पन्नाच्या लोकांच्या सम्पत्ति-दानाचा हिस्सा कोणत्या परिमाणांत वाढावा असें विचारलें जातें. याचें थोडेसें स्पष्टीकरण होअून जाणें योग्य आहे. शिवाय सम्पत्ति-दानाचा संकल्प लांब मुदतीसाठीं करावयाचा असल्याने आणि त्या दरम्यान अुत्पन्न वाढण्याचा किंवा घटण्याचा बराच संभव असल्याने, संकल्प करतेवेळी जें अुत्पन्न असेल त्यांत पुढें जाअून कमी-जास्त फरक झाला तर सम्पत्ति-दानाच्या हिश्याचें परिमाण काय असावें याचा सुद्धा थोडा अंदाज असणें सर्वस्वी योग्यच आहे. असा अंदाज असला तर दात्याला वारंवार नवें दान-पत्र भरून त्या परिमाणांत आपला हिस्सा कमी-जास्त करता यावा म्हणून अिथें हिश्याच्या परिमाणाकडे संकेत केला जात आहे. पण हे कांही कायदेशीर कराचें परिमाण नव्हे ही गोष्ट आपण ध्यानांत ठेवली पाहिजे. दाता आपल्या परिस्थितिनुसार कांही कमी-जास्त करूं शकेल. पूज्य विनोबांचें तर असें म्हणणें आहे की दरिद्रिनारायणाला आपल्या घरचा अेक हिस्सेदार समजून तितकी मदद सम्पत्ति-दान-यज्ञांत प्रत्येकाने केली पाहिजे. खरोखर सम्पत्ति-दानाची मात्रा तशीच असायला पाहिजे. परंतु ज्यांचें अुत्पन्न फार कमी आहे त्यांच्या निर्वाहाच्या अडचणीचा विचार करून कांहीतरी संकेत ठरवून दिला पाहिजे अशी मागणी आहे. म्हणून परिमाण सुचविलें आहे. ते कमीत-कमी आहे असेच आपण मानले पाहिजे व अधिकांत अधिक देण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

माझ्यामतें, ज्यांचें मासिक अुत्पन्न पन्नास रुपयापर्यंत आहे, त्यांनी अेक रुपयामागे अेक पैसा म्हणजे चौसष्टावा हिस्सा, पन्नासाच्या वर दीडशें

रुपयापर्यंत ज्यांचें मासिक अुत्पन्न आहे त्यांनी रुपयामागें दोन पैसें म्हणजे बत्तिसावा हिस्सा, दीडशेंच्या वर व अडीचशें रुपयापर्यंत ज्याचें मासिक अुत्पन्न आहे त्यांनी रुपया मागें तीन पैसें म्हणजे विसावा हिस्सा सम्पत्ति-दान-यज्ञांत अर्पण करावा. अशा तऱ्हेनें पुढल्या प्रत्येक शेकड्यावर अेक-अेक पैसा वाढवीत जाअून सध्या पहिलें पाअूल म्हणून हळूहळू सहाव्या हिश्याचें परिमाण गाठलें पाहिजे. ज्यांचें अुत्पन्न भरपूर आहे त्यांनी तर यापेक्षांही अधिक दिलें पाहिजे. ज्यांचें मासिक अुत्पन्न पन्नास रु. आहे त्यांची सम्पत्ति-दानाची रकम फार थोडी होअील व वर लिहिलेल्या अुद्दिष्टांनुसार खर्च करणें कदाचित त्या व्यक्तीला अवघड वाटेल. म्हणून माझें असे मत आहे की, त्यांनी आपल्या सम्पत्तिदानाची रकम आपल्या अिच्छेनुसार स्वतःच अथवा तितकेंच दान देणाऱ्या अन्य व्यक्तीशी मिळून मिसळून कोणत्याहि सार्वजनिक हिताच्या कामासाठी खर्च करावी. परंतु बाकी साऱ्या सम्पत्तिदान करणाऱ्याच्या सम्पत्तिदानाची रकम वेळोवेळी सम्पत्तिदानाच्या ज्या योजना बनतील त्यासाठीच खर्च झाली पाहिजे. अेक वेगळी व्यवस्था देखील या बाबतीत होअू शकते. साऱ्या देशाच्या दृष्टीनें अेखादी विशेष योजना अमलात आणायची असली, तर त्यासाठी केन्द्रीय व्यवस्थेकडून मार्गदर्शन मिळविणे जरुरीचें होअील. म्हणून सम्पत्तिदान-यज्ञाच्या बाबतीत असे गृहीतच धरले पाहिजे की पूज्य विनोबाजी कांही विशेष निर्देश देतील तर त्यानुसार व्यवस्था करावीच लागणार आहे.

---

# सम्पत्ति-दान-यज्ञाच्या दान-पत्राचा नमूना

श्री विनोबाजींनी भारतीय परम्परेनुसार आर्थिक क्रान्तीच्या अहिंसक प्रक्रियेला संपूर्ण रूप देण्याच्या दृष्टीने लोकांकडून भूमिशिवाय आपल्या सम्पत्तीचा षष्ठांश देण्याची मागणी केली आहे. भूमिदान-यज्ञांत जे लोक भूमि नसल्यामुळें विशेष सहकार्य देअू शकत नव्हतें, त्यांच्यासाठीहि आतां मार्ग अुघडला गेला आहे. दरिद्रीनारायणासाठी केलेल्या आपल्या ह्या आवाहनावर मी आपल्या अुत्पन्नाचा / खर्चाचा.........हिस्सा सम्पत्ति-दान-यज्ञात अर्पित करतो आणि दरसाली आपल्या निर्देशानुसार ह्याचा विनियोग सार्वजनिक कार्यासाठी करीन.

माझ्या अुत्पन्नाचा अथवा खर्चाचा जितका हिस्सा सम्पत्ति-दानांत अर्पण करण्याचें ठरविलें आहे त्याचा वार्षिक हिशेब, आपल्याला किंवा आपल्या प्रतिनिधीला किंवा ज्या समितीला आपण अधिकार द्याल, तिला मी नियमितपणें पाठवीन.

माझ्या संकल्पाचा साक्षी अंतर्यामीच्या रूपांत असलेला मी स्वतःच आहे आणि मला माझ्या अन्तरात्म्याशी प्रामाणिक रहावयाचें आहे.

अीश्वर मला सामर्थ्य देवो.

माझ्या मिळकतीचा—अुत्पन्न/खर्चाचा अंदाज/

वार्षिक/मासिक

तारीख.............. हस्ताक्षर...........

पूर्ण नांव..................................

पत्ता..............................

**सूचना** :—दानपत्र भरून प्रांतिक भूदान-समितीच्या कचेरीत पाठवावे.

## सम्पत्ति-दान यज्ञाच्या रकमेचा अुपयोग

(१) भूदान-यज्ञानुसार ज्या भूमिहीन किसानांना जमीन दिली जाअील त्यांच्यासाठी साधन-सामुग्री.

(२) जे गरीब कार्यकर्ते ह्या यज्ञांत अथवा ग्राम-सेवा कार्यांत भाग घेतील त्यांचा निर्वाह.

(३) सत्साहित्याचा प्रचार.

(४) ह्याशिवाय विनोबा अथवा सर्व-सेवा-संघ ठरवतील ती अन्य अुद्दिष्टें.

सम्पत्ति-दान-यज्ञाच्या रकमेंतून १/३ हिस्सा दात्याला आपल्या अिच्छेनुसार सार्वजनिक समाज हिताच्या कामांत खर्च करतां येअील. पण कमीत कमी २/३ भाग तरी वर लिहिलेल्या अुद्दिष्टांसाठी खर्च झाला पाहिजे.

सम्पत्ति-दान-यज्ञाचा संकल्प जन्मभरासाठी असला तर फार चांगलें. पण कुणी असा विचार अेकदम करू शकत नसेल तर त्याने निदान पांच वर्षासाठीं संकल्प केला पाहिजे. आणि पांच वर्षाच्या अनुभवानंतरहि आपल्याला मुदत वाढवावयाची आहे असा अिरादाहि असला पाहिजे.

व्यय म्हणजे कौटुंबिक खर्चात, बालकांचें शिक्षण आणि विवाह आदि प्रसंगाचा खर्चहि शामील आहे.

